# पुरस्कार

श्री. सयाजीराव सिलम, नायब राज्यपाल पांडिचेरी यांच्या सत्तराव्या वाढदिवसाचे प्रसंगी प्रकाशित होणाऱ्या अभिनंदन ग्रंथास मी दोन प्रास्ताविक शब्द लिहावेत म्हणून मला सांगण्यांत आलें व मीहि कांहीं सबब पुढें न करतां तें मान्य केलें, याचें कारण त्यांचा माझा विरेयक वर्षांचा विविध क्षेत्रांत आलेला घनिष्ट संबंध होय. श्री. सयाजीराव माझे नुसते स्नेहीच नाहींत तर एक सहकारी व खांद्याला खांदा लावून कॉंग्रेससंघटनेंत काम केलेली व्यक्ति म्हणून मला त्यांच्याविषयीं विशेष जिव्हाळा. कायदेमंडळांत असो किंवा मुंबई नगरपालिकेंत असो, श्री. सयाजीरावांच्या कामाची शिस्तबद्धता वाखाणण्याजोगी असे. कुठलेंहि काम हाताळण्याची एक विशेष हातोटी त्यांनिजवळ असे व म्हणूनच समाजावर एक आपुलकीची छाप ते पाडूं शकले. एक कार्यकुशल नायब राज्यपाल म्हणून त्यांची प्रसिद्धी तर झालीच आहे. त्यांच्या ह्या वाढदिवसाचे प्रसंगीं मी त्यांना सुखसमृद्धीचें निरामय जीवन चिंतितों व त्यांच्या मार्गदर्शनाचा लाभ त्यांच्या अखंड मित्रपरिवारास मिळो ही सदिच्छा व्यक्त करतों.

श्री. सयाजीरावांना अर्पण होणाऱ्या अभिनंदन ग्रंथांत प्रसिद्ध झालेल्या नामवंत व्यक्तींच्या लेखांतून श्री. सयाजीरावांच्या आतापर्यंतच्या कार्यांचें सम्यक् दर्शन घडेलच. तथापि स्वतःच्या जीवनविकासाचें रहस्य इतरांपुढें उलगडून सांगतांना माणसाला संकोचल्यासारखें वाटणें स्वाभाविक असलें तरी आपल्या आयुष्याच्या ७० वर्षांचा आढावा घेऊन त्यामधील अनुभवांचें सार त्यांनीं महाराष्ट्रीय बंधुभगिनींपुढें ठेवावें असें मला वाटतें. समाजाच्या अपेक्षेची पूर्ति श्री. सयाजीराव करतील यांत संदेह नाहीं.

नवी दिल्ली,
दिनांक ५-५-१९६६

स. का. पाटील

---

# अनुक्रमणिका

: १ :

## प्रास्ताविक

आपल्या देशबांधवांची सेवा करण्यासाठींच त्याचा जन्म होता, ही सुप्रसिद्ध उक्ति कोणाच्या संबंधांत कोणी वापरली आहे, तें मला आज आठवत नाहीं. परंतु ती उक्ति आज सयाजीराव लक्ष्मणराव सिलम यांच्या रूपानें आमच्यासमोर मूर्तिमंत उभी आहे.

मुंबईच्या सार्वजनिक जीवनांतील अशी एकहि संस्था सांगतां येणार नाहीं, की जिच्याशीं सिलम यांचा या ना त्या नात्यानें संबंध आलेला नाहीं. त्यांनी अनेक लोकोपयोगी संस्थांना जन्मास घातलें; मृतावस्थेंतील संस्थाना संजीवन दिलें; खुरडलेल्या संस्थांना बाळसें प्राप्त करून दिलें; अप्रसिद्ध संस्थाना नावारूपास आणलें; मिरासदार संस्थांना जनताभिमुख केलें. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे, ज्या ज्या ठिकाणीं ते गेले, त्या त्या ठिकाणीं त्यांनीं आपल्या व्यक्तिमत्त्वाचा व कर्तृत्वाचा ठसा उमटविला आहे. त्यांच्या जीवनांतील हा एक उल्लेखनीय विशेष होय. रंक असो, राव असो, लहान असो, थोर असो, अप्रसिद्ध असो, सुप्रसिद्ध असो, स्वकीय असो, परकीय असो, ज्ञातिबांधव असो वा नसो, सर्वांकडे ते समान दृष्टीनें पहातात, सर्वांना समानतेनें वागवतात, अशा वेळीं त्यांच्या मनाला आपपर भाव शिवत नाहीं, आणि पंक्तिप्रपंच तर त्यांना ठाऊकच नाहीं

चार तपांच्या क्रियाशील अशा सार्वजनिक सेवेंत सिलमनीं काय मिळविलें ? मुंबई नगरपालिकेचा सदस्य या नात्यानें त्यांनीं जीं सत्तास्थानें भूषविलीं त्यांचा उपयोग त्यांनीं स्वतःच्या मालकीचे इमले उठविण्यासाठीं केला काय ? तर त्याचें उत्तर ' नाहीं ' असेंच द्यावें लागेल. मुंबई प्रदेश कॉंग्रेसमधील अधिकारपदाचा उपयोग त्यांनीं स्वतःची

पतिशा वाढदिवशाठी केला काय, तर त्याचें उत्तर 'नाही' असेंच यावें लागेल. मुंबई विधान सभेमध्यें ते प्रथम काँग्रेस पक्षाचे मुख्य प्रतोद झाले व मागाहून विधान परिषदेचे अध्यक्ष बनले, परंतु त्या दोन्ही स्थानांचा उपयोग त्यांनी स्वतःच्या स्वार्थासाठी करून घेतल्याचें एकही उदाहरण देतां येणार नाही. आणि आज पाँदेचरीचे लेफ्टनण्ट गव्हर्नर या नात्यानें सर्व सत्ता त्यांच्या हातीं असतांनादेखील ते उपभोग-शून्य योग्याचें जीवन जगत आहेत. म्हणूनच उपरोक्त सर्व क्षेत्रांतील लोकांच्या तोंडून आजहि उद्गार निघत आहेत–सिल्म ते सिल्म! त्यांची बरोबरी कोण करूं शकणार!

सिल्म म्हणजे विशुद्ध चारित्र्य, अफाट कर्तृत्व, अपरंपार लोकप्रियता, कडक शिस्त, विलक्षण निःस्पृहता, कमालीचा स्पष्टवक्तेपणा, दुदम्य आशावाद, लोकमताची कदर, कर्तव्यनिष्ठा व परोपकार. या त्यांच्या एकेक गुणाचे पैलू असे चमत्कार आहेत कीं, कोणीहि प्रभावितच होईल.

- अशा सिल्मवाहेयांच्या चरित्राचें यथार्थ व सम्यक निरूपण करणें, ही महा कठीण गोष्ट आहे. त्यांतून त्यांच्या जीवनाचें सर्व पैलू सादर करणें तर फारच कठीण. सृजनशील व वर्धिष्णु जीवनाचे ते मूर्तिमंत प्रतिक आहेत. त्या जीवनाच्या कांहीं कथा या ठिकाणीं त्यांच्या सत्तराव्या वाढदिवसाच्या निमित्तानें सादर करण्याचा हा अल्पसा प्रयत्न आहे.

## : २ :

## शिक्षण आणि समाजसेवा

मुंबई शहरांत 'कामाठीपुरा' या संज्ञेनें ओळखला जाणारा एक विस्तीर्ण लत्ता आहे. जेथे कामाठी रहातात तो कामाठीपुरा हें उघडच आहे. हे कामाठी लोक कोण, कुठले याची आपणाला तशी थोडीबहुत कल्पना आहे. तथापि या जमातीच्या इतिहासाचें संशोधन कोणी केलें, तर त्याला मुंबईचा विस्तार व विकास कसा झाला व त्यामध्यें या कामाठी लोकांनी किती महत्त्वाची कामगिरी बजावली आहे, याची कल्पना येईल.

मुंबई शहरामध्यें आज जे विविध जमातींचे लोक दिसतात ते सर्व उपरे असून ते कारणपरत्वे मुंबईला आले आहेत. कांहीं जमाती व्यापाराकरितां आल्या, कांहीं जमाती रोजगारासाठीं आल्या. त्या विविध जमातींतील थोर लोकांनीं मुंबईचा इतिहास घडविला. नाना शंकरशेटसारख्या व्यक्तींचा गौरव, आधुनिक मुंबईचे शिल्पकार म्हणून झाला. परंतु ज्यांनीं मुंबईचे रस्ते बांधले, मोठमोठ्या इमारतींचीं बांधकामें केलीं, किंबहुना ज्यांचा शहर-रचनेमध्यें प्रत्यक्ष हातभार लागला, जे शहराच्या वेशीबाहेर राहिले व ज्यांनीं ह्या शहराची वास्तु घडविली, त्यांना कोणी आधुनिक मुंबईचे शिल्पकार म्हणत नाहीं. त्यांच्यामध्यें

अनेक नेते होऊन गेले, त्यांनीं सरकार दरबारी मान मिळविला. ते रावसाहेब, रावबहादूर दिवाणबहादूर या सरकारी पदव्यांनीं भूषविले गेले, त्यांचीं चरित्रें लिहिलीं गेलीं, त्यांची मात्र घत्र घोडे बारा टक्के या न्यायानें ' कामाठी ' या विशेषणानें संभावना आजदेखील केली जाते.

परंतु कामाठी म्हणजे कांहीं विशिष्ट जात नाहीं, जसे घाटी, कोंकणी, गुजराती, मारवाडी, त्या अर्थानें कामाठी. हे लोक आंध्र प्रदेशांतून, निजामाच्या राज्यांतून आले. ते आपली भाषा व संस्कृति घेऊन आले. या मुंबई शहराची बांधणी करण्यासाठीं आले. आणि जे आले ते या शहरांत कायमची वस्ती करून राहिले, ते येथील मराठी जीवनाशीं, मराठी संस्कृतीशीं व मराठी भाषेशीं इतके समरस होऊन गेले कीं, ते महाराष्ट्राचे बनले. ते आपले आंध्रपण विसरून गेले आहेत, निदान सार्वजनिक जीवनांत, त्यांचा सवता सुभा आता कधीं कुठे व्यक्त होत नाहीं. त्यांचीं कांहीं वैशिष्ट्यें म्हणजे कामाठीपुऱ्यांतील त्यांच्या विविध ज्ञाती संस्था, त्यांचीं मंदिरें व त्यांची तेलगू भाषा. ही त्यांची भाषा भ्रष्ट स्वरूपांत कां होईना आजहि त्यांनीं जतन करून ठेवली आहे. ती फक्त आज त्यांच्या घरांत ऐकूं येते व तिचा त्यांना मोठा अभिमान वाटतो. हे लोक महाराष्ट्रांतील मराठी माणसांपेक्षा वेगळे आहेत हें फक्त ते तेलगू बोलतात तेव्हां समजतें, एरव्ही ते मराठी जीवनाशीं एकरूप होऊन गेले आहेत.

आतां महाराष्ट्रीय समाजांत एकरूप झालेल्या अशा एका आंध्र घराण्यांत सयाजीराव लक्ष्मणराव सिलम यांचा जन्म, याच मुंबई शहरांत, त्याच कामाठीपुऱ्यांत ता. १८ मे १८९६ रोजीं झाला. सिलमांचें घराणें सुमारें दीडशें वर्षांपूर्वी व्यापारानिमित्त मुंबईस आलें हें मुद्दाम सांगितलें पाहिजे. इतर आंध्रवासीयांप्रमाणें हे सिलम निजाम हैद्राबादमधून आले. आजच्या मराठवाड्यांतील करकेली हें त्यांचें मूळचें गांव. परंतु गेल्या दीडशें वर्षांत या घराण्यांत इतकी क्रान्ति झाली आहे व हें घराणें इतकें महाराष्ट्रमय झालें आहे कीं, सिलम कोणी परके आहेत असें आम्हांला वाटतच नाहीं. ते आंध्रचे आहेत, तेलगू आहेत, हें आम्हांला सांगावें लागतें. सयाजीरावांचे वडिल लक्ष्मणराव, तसेच आजोबा सयाजीराव हे दोघेहि परंपरेनें कापडाचे व्यापारी होते. परंतु सिलम त्या परंपरेंतून बाहेर पडले.

सिलमांच्या घराण्याला कापडाच्या व्यापारांत कांहीं घडघेज पैसा मिळाला नाहीं. ते रांगते बोलते होण्यापूर्वीच त्यांच्या डोक्यावरील मातापित्यांचें छत्र एकाएकी नाहीसें झालें, त्यावेळीं सिलम घराण्याची सांपत्तिक स्थिति तशी उत्तमच होती. त्यांच्या काकाकाकींनीं त्यांच्या लालनपालनाची सर्व जबाबदारी घेतली म्हणूनच त्यांचें शालेय व कॉलेजमधील शिक्षण त्यांना पुरें करतां आलें. आपल्या चुलत्याचुलतींचें हें ऋण स्वतः सिलम आपल्या आयुष्यांत कधींच विसरले नाहींत.

सयाजीरावांचें प्राथमिक शिक्षण ज्या कामाठीपुऱ्यांत ते रहात होते त्या ठिकाणी झालें. मराठी दुसरीपर्यंतचें शिक्षण सरकारी शाळेंत झाल्यानंतर पुढें तिसऱ्या इयत्तेमध्यें ते भार्गव विनायक जोशी यांच्या शाळेंत गेले आणि पुढें इंग्रजी शिक्षणासाठीं ते १९०६ सालीं सुप्रसिद्ध विल्सन हायस्कूलमध्यें दाखल झाले. प्राथमिक शाळेमध्यें त्यांचे सहाध्यायी आजचे मान्यवर डॉ. वि. रा. भूमरथ हे होते. त्या दोघांनीं आपल्या समाजामध्यें लोकजागृतीचें कार्य विद्यार्थीदशेंत असल्याच्या वेळेपासून केलें आहे.

सयाजीराव विल्सन हायस्कूलमध्यें इंग्रजी तिसऱ्या इयत्तेंत आणि त्यांचे सहकारी भूमरथ आर्यन एज्युकेशन सोसायटीच्या हायस्कूलमध्यें शिकत असतांना त्या दोघांनीं आपल्या २५-३० सवंगड्यांच्या सहाय्यानें १९०८ सालीं, 'तेलगू बालक ज्ञानोत्तेजक समाज' नांवाची संस्था स्थापन केली.

त्या काळांतील विद्यार्थी ज्ञानार्जनाच्या मागें लागत असे. आपल्या शालेय अभ्यासा-व्यतिरिक्त निरनिराळ्या विषयांचा अभ्यास करणें, कोणा मोठ्या माणसाचें व्याख्यान असलें तर त्याला जाणें आणि वादविवाद-चर्चा यामध्यें भाग घेणें, हा तत्कालिन विद्यार्थ्यांचा आवडता छंद होता. लोकमान्य टिळक व समाजसुधारक आगरकर यांच्या राजकीय व सामाजिक जागृतीचें तें युग होतें. त्या युगाचा ठसा सयाजीरावांच्या मनावर शालेय जीवनापासूनच उमटला होता. त्यांना आपल्या आयुष्यांत समाजसेवा व देशसेवा यांचें जें विलक्षण वेड लागलें व त्या कार्याला त्यांनीं वाहून घेतलें याचें कारण विद्यार्थीदशेंमध्यें या दोन विभूतीं-च्या शिकवणीचा त्यांच्या मनावर झालेला परिणाम होय. आजहि त्या काळांतील आठ-वणी सिलम मोठ्या तन्मयतेनें रंगवून सांगतात.

त्या काळांत मुंबईंतच नव्हे तर समस्त महाराष्ट्रांत विलक्षण लोकजागृति झाली होती. त्यावेळीं वैचारिक जागृति केवळ सुशिक्षितांमध्यें व पांढरपेशा समाजांतच झालेली नव्हती. कामाठीपुऱ्या सारख्या मुंबई शहराच्या मागासलेल्या विभागात बहुजन समाजांतदेखील त्या जागृतीचें लोण पसरविण्याची जबाबदारी सिलम यांच्यासारख्या तरुण विद्यार्थ्यांनें स्वयंप्रेरणेनें आपल्या शिरावर घेतली.

बाल शिवाजीनें वयाच्या सोळाव्या वर्षी तोरणा किल्ला सर करून स्वराज्याचें तोरण बांधलें असें इतिहास सांगतो. तर बाल सयाजीनें वयाच्या बाराव्या वर्षी 'तेलगू बालक ज्ञानोत्तेजक समाज' स्थापन करून, निबंधस्पर्धा, वक्तृत्वस्पर्धा, विद्वानाचीं व्याख्यानें, तसेंच विविध खेळांचे सामने घडवून आणून आपल्या समाजामध्यें अशी कांहीं जागृति केली कीं, भविष्यकाळांत स्वराज्याच्या लढ्यांत आपल्या बांधवांचीं एक मोठी पलटण ते उभी करूं शकले. सिलम यांचा कामाठीपुऱ्याच्या सार्वजनिक जीवनांत, तेलगू समाजाच्या चळ-वळींत प्रवेश होण्यापूर्वी तेथील वातावरण रावमान्य लोकांचें होतें. त्या लोकांची मिरासदारी

तेथील जनतेमध्यें होती. सिलम व त्यांचे सहकारी यांनीं. तेथील जीवनामध्यें व आपल्या तेलगू समाजांत क्रान्ति घडवून आणली. आणि सिलम हे तेलगू समाजांतील पहिले लोकमान्य नेते झाले, असें मी म्हटलें तर ती अतिशयोक्ति होणार नाहीं.

या सार्‍या शैक्षणिक व सामाजिक उपक्रमांबरोबरच सयाजीरावांचा अभ्यास चालूच होता. १९१२ साली मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर ते विल्सन कॉलेजमध्यें दाखल झाले, तेथे त्यांनीं १९१७ सालीं बी. ए. ची परीक्षा दिली आणि १९२० साली ते एल्. एल्. बी. ची परीक्षा उत्तीर्ण झाले.

विद्यार्थीदशेंत असतांना सिलमसारख्या विद्यार्थ्यांना त्यांच्याच विभागांतील शंकरराव परशा यांच्यासारख्या थोर पुरुषांचें मार्गदर्शन लाभलें. त्या काळांतील टिळकांच्या अभिमानी मंडळींत त्यांची गणना प्रामुख्यानें होत असे. तेलगू समाजामध्यें सामाजिक जागृति घडवून आणण्याचें श्रेय त्यांना दिलें पाहिजे. महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं पसरलेल्या तेलगू समाजाला त्यांनीं प्रथम जागृत केलें. त्यांची संघटणा त्यांनी उभारली. त्यांच्याच पुढाकारानें तेलगू विद्यार्थ्यांच्या शिक्षण-निधीला चालना मिळाली. त्यामुळें होतकरू व गरीब मुलांच्या शिक्षणाची सोय लागली. 'लिंगूबाई एज्युकेशन फंड' हा शिक्षणनिधि या शंकरराव परशांच्या प्रयत्नानें अस्तित्वांत आला. तेलगू समाजामध्यें वाचनाची आवड निर्माण व्हावी म्हणून त्यांनीं एक 'तेलगू फ्री लायब्ररी' काढली. या सर्व चळवळींचा परिपाक म्हणजे 'तेलगू समाचार' हें मासिक.

त्या काळांत नियतकालिक हें समाजिक जागृतीचें एक साधन असे. मराठी संस्थानिक व त्यांच्या आश्रयानें राहिलेले व आपल्या मराठा समाजाच्या कल्याणासाठीं झटणारे लोक या साधनाचा उपयोग लोकजागृतीसाठीं करीत असत. मराठा विजय, मराठा मित्र, सयाजी विजय हीं नियतकालिकें मराठी समाजांत लोकजागृतीचें कार्य करीत असत. त्या कोटींतील 'तेलगू समाचार' हें मासिक तेलगू समाजाच्या उन्नतीसाठीं निघालें होतें. हें मासिक व तेलगू समाजाच्या उन्नतीसाठीं निघालेल्या उपरोक्त स्वरूपाच्या इतर संस्था यांच्या कार्याचा परिपाक म्हणजे तेलगू भाषिकांचें १९१५ अखेर भरलेलें तेलगू संमेलन. या संमेलनाचे संयोजक अर्थातच शंकरराव परशा होते आणि अध्यक्ष सरकार दरबारी मान्यता पावलेले रावसाहेब पोरेड्डी होते.

शंकरराव परशा, रावसाहेब पोरेड्डी वगैरे मंडळी जुन्या पठडींतील व सरकारच्या आश्रयानें समाजसेवा व लोकजागृतीचें काम करणारीं असल्या कारणानें आणि सिलम हे नव्या पिढींतील टिळक-परांजपे-आगरकर यांची शिकवण मनावर बिंबलेले तरुण असल्या कारणानें त्याचें त्या लोकांशीं सामंजस्य होऊं शकलें नाहीं. त्यानीं आपल्या पुरोगामी विचारानें व कार्यपद्धतीमुळें तेलगू समाजामध्यें एक स्वतंत्र विचाराचा व स्वदेशाभिमानी असा अनुयायांचा वर्ग निर्माण केला होता. स्वतः सिलम

जसे वक्ते तसे लेखकहि होते; इतकेंच नव्हे तर कवीहि होते. टिळक, आगरकर, चिपळूणकर पितापुत्र, शिवराम महादेव परांजपे, लोकहितवादी, बाळशास्त्री जांभेकर आदींचें वाङ्मय सिलम यांनीं आत्मसात केलें होतें. त्यामुळें त्यांना सहाजिकच वाटूं लागलें कीं, आपण आपल्या समाजामध्यें नवीन विचारांचा प्रसार करण्यासाठीं व त्याच्या ठिकाणीं स्वदेशाभिमान जागृत करण्याकरितां स्वतःचें स्वतंत्र मासिकपत्र सुरूं करावें. 'तेलगू समाचार' पत्राशीं ते कधींच समरस होऊं शकले नाहींत. आणि त्यांनीं भूसरथ यांच्या सहकार्यानें 'तेलगू मित्र' हें मासिक पत्र सुरू केलें. आपलें हें मासिक तेलगूभाषिक समाजामध्यें सामाजिक, शैक्षणिक व राजकीय जागृति घडवून आणण्यासाठींच केवळ आहे, हें आपलें उद्दिष्ट त्यांनीं सुरवातीलाच स्पष्ट केलें.

वास्तविक सिलम यांची मातृभाषा तेलगू होती, शाळेंतील भाषा इंग्रजी होती आणि 'फारशी' ही त्यांची दुसरी भाषा होती. परंतु या मासिक पत्रासाठींच केवळ नव्हे तर आपल्या समाजामध्यें मराठी भाषेचा प्रसार व्हावा म्हणून त्यांनीं त्या भाषेचा व्यासंग वाढविला. कॉलेजांत असतांना त्यांनी एका तत्वचेत्या फारशी कवीच्या फारशी काव्याचा मराठींत अनुवाद केला होता. हा अनुवाद पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाला होता. रा. रा. तेलगू कृत "गीतालाप" नांवाची एक छोटी पुस्तिका तेलगू बालक ज्ञानोत्तेजक समाजमालेचें पुष्प म्हणून प्रसिद्ध आहे. त्याची एक दुर्मीळ प्रत आमचे मित्र व सिलम यांचे जामात डॉ. बा. रा. नायर यांच्या संग्रहीं आहे. हे लेखक रा. रा. तेलगू म्हणजे सयाजीराव सिलम. ही पुस्तिका डॉ. आनंदराव नायर यांना फार आवडली होती असें सांगतात.

'तेलगू मित्र' या मासिकाचे अंक आज उपलब्ध नाहींत. परंतु तें एक अत्यंत जहाल विचारांचें व तेलगू समाजांतील घडणाऱ्या घडामोडींचा खरपूस समाचार घेणारें असें स्वतंत्र बाण्याचें मासिक होतें. त्यानें शंकरराव परशा यांच्या 'तेलगू समाचारा' ला चांगलाच शह दिला. या मासिकाची लोकप्रियता तरुण तेलगू समाजांत झपाट्यानें वाढत गेली. आणि जुन्या पिढींतील सरकारमान्य पुढाऱ्यांची तेलगू समाजावरील पकड ढिली होऊन सयाजीराव सिलम व शंकरराव पुप्पाला यांच्याकडे नवीन पिढीचें नेतृत्व गेलें.

सिलम, पुप्पाला आदि तरुण मंडळी सभा-संमेलनें, वादविवाद मंडळें गाजविणारे बोलघेवडे तरुण नाहींत, दिखाव्यासाठी कांहींतरी तें लिहावें व समाजांत खळबळ उडवून द्यावी म्हणून लेखनकंडू शमविणारे लेखक नाहींत, तर समाजोपयोगी असें विधायक कार्य करणारे कळकळीचे कार्यकर्तेदेखील आहेत याचा प्रत्यय पहिल्या महायुद्धानंतर १९१८ सालीं तापसरीची जी देशव्यापी साथ आली त्यावेळीं आला. त्या काळांत परिस्थिती अशी होती कीं, शहरांत हजारोंच्या संख्येनें लोक आजारी पडत होते, शेंकडयांनीं मरत होते, डॉक्टर तर अपुरे पडले होतेच आणि इस्पितळांतूनहि रोग्यांना जागा नव्हती. अशा वेळीं सिलम

आपले तेलगू बालक ज्ञानोत्तेजक मंडळांतील सुमारें पन्नास तरुण कार्यकर्ते घेऊन रोगपीडितांना व संकटग्रस्तांना मदत करण्यात पुढें सरसावले. डॉ. ढवळे व विठोबा पुप्पाला यांच्या नेतृत्वाखालीं एका औषधोपचार केंद्राची त्वरित स्थापना करण्यांत आली. डॉ. भूधरथ त्यावेळीं एका जैन इस्पितळांत रात्रपाळीच्या कामाला होते. ते देखील त्यांना येऊन मिळाले. त्यांनीं व सिलम यांच्या तालमींत तयार झालेल्या मंडळीनीं रात्रंदिवस झटून अनेक दुःखितांना मदत केली. त्या सांथीत सिलम यांचे मेहुणे धर्माजी कुडताल, जे त्यांच्या सर्व कार्यांत प्रथमपासून होते, ते दगावले. परंतु सिलमनीं वैयक्तिक दुःख बाजूला सारून आपल्या विभागांतील सर्व धर्मांच्या व जातींच्या रहिवाशांची एकनिष्ठपणें सेवा केली व अनेकांचा दुवा मिळविला.

अशा रीतीनें विद्यार्थीदशेपासून समाजाची सेवा करीत असलेले व आयुष्यांत परक्याची गुलामगिरी करावयाची नाही, आणि सरकारची तर नाहींच नाहीं, अशा बाणेदारपणानें जीवन जगलेले सिलम १९२० सालीं वकिलीची परीक्षा उतीर्ण झाल्यावर स्वतंत्रपणें कोर्टांत वकिली करूं लागले. परंतु त्यांच्या आतापर्यंतच्या संघर्षमय जीवनाला वकिलीच्या पेशांत स्थैर्य प्राप्त व्हावें असें नियतीच्या मनांत नव्हतें. त्याच सालीं लोकमान्य टिळक निधन पावले आणि भारताच्या राजकीय जीवनांतील ती पोकळी भरून काढण्यासाठीं स्वाभाविकपणें महात्मा गांधी पुढे आले. त्यांनीं असहकारितेचें रणशिंग फुंकलें, एका वर्षांत स्वराज्य मिळवून देतों, अशी त्यांनीं घोषणा केली. आणि शाळाकॉलेजें व सरकारी नोकऱ्या सोडण्याचा आदेश त्यांनीं आपल्या अनुयायांना दिला. सिलम अगोदरच लोकमान्य टिळकांच्या आदर्शानें भारावलेले होते. टिळकांचा वारसा पुढे चालविण्यास महात्मा गांधी पुढे सरसावले आहेत तेव्हां त्यांच्या मार्गानें आपण गेलें पाहिजे, याबद्दल त्यांच्या मनांत शंका नव्हतीच. त्यांनीं आपल्या कौटुंबिक परिस्थितीचा विचार केला नाहीं व कोर्टावर बहिष्कार घातला !

त्या वेळीं सिलम सडेफटिंग नव्हेत. १९०८ सालीं म्हणजे वयाच्या बाराव्या वर्षींच त्याचें लग्न झालें होतें. इंटरमध्यें असतांना ते बाप झाले होते; म्हणजे त्याचा संसार वाढता होता. परंतु देशाभिमानानें पेटलेल्या सिलमनीं त्याचा विचार कधीं केला नाहीं. ते ध्येयनिष्ठ होते दृढनिष्ठ होते. एकदां पाऊल पुढें टाकलें की, तें मागें घ्यावयाचें नाहीं, हा त्यांचा बाणा होता. परिस्थितीनुरूप कसें व्हावें, संसार नेटका कसा करावा, तें शिक्षण कुटुंबाला मिळालें होतें. एक वडिलार्जित घर होतें, त्याच्या भाड्यांतून घरखर्च मोठ्या मिनतवारीनें चालला असता. परंतु सिलमच्या मित्रांचें त्यांच्यावर इतकें प्रेम होतें कीं, त्यांना अशा परिस्थितींत ते एकाकी सोडण्यास तयार नव्हते. त्यांनीं गंगाराम तेलंग या बिल्डिंग कॉन्ट्रॅक्टरांना गांठलें. ते स्वतः राष्ट्रीय बाण्याचे असून देशभक्तांची कदर करणारे होते. त्यांना सिलमांच्या कर्तृत्वाची कल्पना होती. आपल्या

समाजासाठीं व देशासाठीदेखील ते किती कष्ट उपसत आहेत, याची जाणीव तेलगांना या मित्रांनी करून दिली. आणि तेलंगांनीं सिलमांना बिल्डिंग कॉन्ट्रॅक्टरच्या धंद्यांत भागीदार म्हणून घेतलें. या नवीन व्यवसायानें त्यांना थोडें बहुत आर्थिक स्थैर्य प्राप्त करून दिलें.

दरम्यानच्या काळांत सिलम यांचें ना केवळ त्यांच्या तेलगू समाजांत तर इतर समाजांतून देखील वजन वाढत होतें. १९१८ सालच्या तारुणीच्या साथींत त्यांचा परिचय कामाठीपुरा भागांतील लोकांना झाला होता. त्यांची लोकप्रियता सारखी वाढत होती. तेव्हां त्यांच्या त्या लोकप्रियतेची कसोटी पहाण्याचें त्यांच्या मित्रांनीं ठरविलें आणि १९२२ सालांतील मुंबई नगरपालिकेच्या निवडणुकीत त्यांनीं त्यांना 'ई' वॉर्डातून उभें करण्याचें ठरविलें.

तो सामना सामान्य नव्हता. त्या वॉर्डातून बाप्टिस्टासारखा मान्यवर नेता निवडणुकीच्या रिंगणांत उतरला होता. लोकमान्य टिळकांचे ना केवळ अनुयायी तर समकालीन मित्र व देशांतील एक अत्यंत लोकप्रिय पुढारी असा त्यांचा लौकिक होता. आणि दुसरे उमेदवार होते श्रीमंत शंकरराव गांगला. तेलगू समाजांतील मान्यवर नेत्यांचा व भांडवलदारांचा त्यांच्या उमेदवारीला भरघोस पाठिंबा होता. परंतु शेवटीं सिलमांची लोकसेवा फळाला आली. मतदारांनीं भांडवलदारांच्या प्रतिनिधीला दूर सारून सिलमांना प्रचंड बहुमतानें निवडून दिलें. 'ई' वॉर्डांतील नागरिकांना इतका आनंद झाला कीं, त्यांनीं फ्लेअर रोडवरील नागू सयाजींच्या बंगल्यावर त्यांचा एक सत्कार समारंभ घडवून आणला.

अशा रीतीनें लोकमान्य झालेले सिलम मुंबईतील बहुजन समाजाचें प्रतिनिधित्व करण्यासाठीं, सामान्य जनतेच्या अडी-अडचणींची दाद लावून घेण्यासाठीं नगरपालिकेंत गेले. तेथे ते १९४६ सालापर्यंत म्हणजे तब्बल दोन तपें राहिले. त्या चोवीस वर्षांत त्यांनीं जी लोकोपयोगी कार्यें केलीं त्याचें स्वरूप इतकें विविधरंगी आहे कीं, त्यावर एक स्वतंत्र ग्रंथच लिहावा लागेल.

## : ३ :

## नगरपालिकेंतील कार्य

मुंबई नगरपालिकेमध्यें सिलम १९२२ ते १९४६ सालापर्यंत होते. त्या चोवीस वर्षांच्या कालखंडांत त्यांनीं नगरपालिकेच्या विविध समित्यांवर काम केलें आहे. स्टँडिंग कमिटी, वर्क्स कमिटी, मार्केट्स् ॲण्ड गार्डन्स कमिटी यांचे ते अध्यक्ष होते. बॉम्बे इम्प्रुव्हमेंट ट्रस्ट कमिटी व स्कूल्स कमिटी यांचे ते सदस्य होते. नगरपालिकेंतील कारकीर्दींत त्यांना

विशेष जनतासंपर्क साधतां आला. या मुंबई शहराच्या काय अडीअडचणी आहेत, कोणत्या प्रश्नांवर विशेष भर दिला पाहिजे व या शहराची सर्वांगीण सुधारणा करण्यासाठी कोणते उपाय योजले पाहिजेत याचें त्यांना अद्यावत ज्ञान होतें. आपल्या चोवीस वर्षांच्या कारकीर्दीत त्यांनीं लोककल्याणाची अनेक कामें केलीं.

आज मुंबई शहरामध्ये नगरपालिकेच्या शाळेच्या इमारती ठिकठिकाणीं झपाट्यानें उभारल्या जात आहेत; या योजनेचे जनक सिठम आहेत, हें मुद्दाम सांगितलें पाहिजे. ते 'स्कूल्स कमिटी' चे सभासद असतांना त्यांच्या हें लक्षांत आलें, कीं मुंबई नगरपालिकेच्या अधिपत्याखालील प्राथमिक शाळांना स्वतंत्र इमारती नाहींत; त्या खाजगी इमारतीमध्ये भाड्याच्या जागेत भरतात. या इमारती हवेच्या व आरोग्याच्या दृष्टीनें योग्य नसतात. तेथील वातावरणहि मुलांच्या दृष्टीनें योग्य नसतें. त्याचा परिणाम मुलांच्या केवळ अभ्यासावरच नव्हे तर चारित्र्यावरदेखील होतो. कांहीं शाळा तर वेश्यांच्या वस्तीच्या परिसरांत भरतात, हा अनुभव त्यांनीं कामाठीपुर्‍यामध्यें घेतला होताच. तेथे तर वेश्यांची दाट वस्ती आहे. परंतु गिरगांव, फुगभाट, कांदेवाडी आदि भर लोकवस्तीमध्यें देखील ठिकठिकाणी वेश्यांचा संचार आहे व त्यांच्या जवळपास शाळा आहेत, असाहि अनुभव त्यांना आला. या शाळांच्या इमारती स्वच्छ ठेवतां येत नाहींत, घरमालक त्यांची योग्य निगा राखत नाहींत, कित्येक इमारती तर मोडकळीस आलेल्या आहेत. तेव्हा शाळेच्या बाबतींतील ही दुरवस्था दूर करण्याचा त्यांनी निश्चय केला, आणि मुंबई नगरपालिकेनें शाळेसाठीं स्वतंत्र इमारती बांधल्या पाहिजेत, नगरपालिकेच्या इमारतींत नगरपालिकेच्या शाळा भरल्या पाहिजेत, या गोष्टीचा त्यांनीं हिरारीनें पुरस्कार केला. त्यांचें ते म्हणणें अखेर मंजूर होऊन, त्यांच्या मार्गदर्शनाखालीं शाळेच्या इमारतीचा प्लॅन मंजूर झाला. त्या प्लॅनप्रमाणें आजच्या इमारती बांधल्या गेल्या आहेत.

नगरपालिकेच्या काहीं विभागीय कचेर्‍यांची सोय नगरपालिकेच्या या स्वतंत्र इमारतींतून करण्यांत आली आहे. म्हणजे या इमारती दुहेरी हेतूनें बांधण्यांत आल्या आहेत त्यामुळे जसा शाळेच्या जागेचा प्रश्न सुटला आहे, तसा विभागीय कचेर्‍यांचाहि प्रश्न सुटला आहे.

या प्रत्येक शाळेला स्वतंत्र आवार मुलांना खेळण्यासाठीं असावें व शक्य त्या ठिकाणीं शाळेचा बाग असावा, ही योजना देखील माझ्या माहितीप्रमाणें सिठम यांची होय. कामगारवस्तीमध्यें प्रथम अशा शाळा बांधण्यांत याव्या, आणि विशेषतः ज्या शाळा वेश्यांच्या वस्तीच्या जवळपास आहेत, त्या ठिकाणच्या वेश्यांना अन्यत्र हलविण्यांत यावें ही त्यांची मागणी होती.

मुंबई नगरपालिकेच्या शाळांना जशा स्वतंत्र इमारती पाहिजेत, तशा तिच्या शिक्षकांच्या निवासाची सोय झाली पाहिजे, असेंहि त्यांचें म्हणणें होतें. नगरपालिकेनें

शहराची साफसफाई करणाऱ्या नोकरांच्या जागेची जशी सोय पाहिली तशी आपल्या शिक्षकांच्या रहाण्याच्या जागेचा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केला. आज नगरपालिका आपल्या शिक्षकांसाठीं स्वतंत्र जागा बांधीत आहे व आपल्या इतर नोकरांसाठींहि इमारती उभारीत आहे. सिल्म यांचें शिक्षण क्षेत्रांतील हें कार्य संस्मरणीय असें आहे. त्या कार्याचा विस्तार समाज-शिक्षण मंडळाच्या कार्यांत कसा झाला व बहुजनसमाजांत प्रौढांच्या शिक्षणाचा पाया कसा घातला गेला तें आपण नंतर पाहूं.

मुंबई शहरामध्यें कामगारांच्या शिक्षणाची सोय करण्यासाठीं रात्रीच्या शाळा कांहीं ठिकाणीं निघाल्या होत्या. अशा शाळांशीं सिल्म यांचा संबंध आलेला होता. अशा शाळांना जागेची अडचण नेहमींच जाणवते असे. त्या शाळांना नगरपालिकेनें आपल्या शाळेची जागा वापरण्यास देण्यास प्रत्यवाय नसावा, या सिल्मांच्या मताचा अखेर प्रभाव पडला. आज कांहीं ठिकाणच्या रात्रींच्या शाळा नगरपालिकेच्या जागेंत भरत आहेत, हें अनेकांच्या लक्षांत आलें असेलच.

मुंबई शहराचा वाढता विस्तार लक्षांत घेतां नगरपालिकेनें स्वतंत्र मार्केटें बांधलीं पाहिजेत, ही गोष्ट त्यांनीं ते मार्केट्स कमिटीचे अध्यक्ष असतांना सभासदांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न केला. तसेंच क्रॉफर्ड मार्केट (आतां महात्मा ज्योतिबा फुले मार्केट) व भायखळा मार्केट यामधील व्यापाऱ्यांच्या अडचणी समजावून घेण्याचा व त्यांचीं गाऱ्हाणीं दूर करण्याचा त्यांनीं जातीनें प्रयत्न केला. नगरपालिकेच्या नोकरांना विश्वासांत घेऊन त्यानीं त्यांच्याच मदतीनें अनेक प्रश्न मोठ्या कौशल्यानें हाताळले. आज मुंबईतील नगरपालिकेच्या मार्केटांची संख्या वाढत आहे व त्यांच्यांत सुधारणा होत आहे, याला सिल्म यांचें दूरदर्शीपणाचें विधायक धोरणच कारणीभूत आहे, असें म्हटलें तर ती अतिशयोक्ति होणार नाहीं.

मुंबईतील दाट लोकवस्ती व गलिच्छ आणि बकाल वातावरण लक्षांत घेऊन मोकळ्या जागा मिळविण्यांत याव्या व त्या ठिकाणीं बगीचे व उद्यानें उभारण्यांत यावींत हें नगरपालिकेचें आज प्रत्यक्षात अमलांत आलेलें धोरण सिल्म यांच्या कारकीर्दीतील. ते ज्या समाजांतून आले, त्या समाजाला फुलबागांचें विशेष अगत्य वाटतें. सिल्म यांची ही बागाबगिच्यांची आवड नंतर ते मुंबई विधान सभेचे अध्यक्ष झाल्यानंतर त्याना आपल्या 'पर्णकुटी' या स्वतंत्र निवासांत पूर्ण करतां आली. पाँडेचरीमधील त्यांचें सरकारी निवासस्थान तर फळाफुलांच्या बगिच्यातच वसलेलें आहे.

मुंबई शहरातील बकाल वस्तींचें बागबगीच्यांनीं नटलेल्या व सुंदर इमारतींनें सजलेल्या सुंदर वस्तीमध्यें रूपांतर झालें पाहिजे, ही नगरी लहान थोर या सर्वांनाच रहाण्यास लायक झाली पाहिजे, ही सिल्म यांची भूमिका ते 'बॉम्बे इम्प्रुव्हमेंट कमिटी' चे सभासद

होते तेव्हांपासूनची होती. तसे पेशानें ते बिल्डिंग कॉन्ट्रॅक्टर होते. तेव्हां शहर सुंदर बनविण्यासाठीं कोणत्या सुधारणा आवश्यक आहेत याची त्यांना पूर्ण कल्पना होती. त्यांची ही योग्यता लक्षांत घेऊन नंतर सरकारनें त्यांना 'बॉम्बे गव्हर्नमेंट हाऊसिंग बॅनेल् ऑफ द पोर्टस् ॲण्ड बॉम्बे सिटी डेव्हलपमेंट कमिटी' या समितीचें अध्यक्षपद दिलें. सिटी इंजिनिअर नानासाहेब मोडक यांचा 'मास्टर प्लॅन' हा त्यांच्या कारकीर्दीतीलच. तसेंच मुंबईचा विकास घडवून आणण्यासाठीं कोणते उपाय योजले पाहिजेत, याबाबत मार्गदर्शन करणारा जो अहवाल वर्ते कमिटीनें सादर केला तोदेखील त्यांच्या कारकीर्दीतीलच. त्यांनीं बकाल वस्तीचें उच्चाटन करण्यासाठीं प्रथम प्रयोगादाखल कामाठीपुन्याची पुनर्रचना करुन त्याचा विकास घडवून आणण्याची योजना सुचविली. कामाठीपुन्यांतील वस्ती ना केवळ बकाल व गलिच्छ आहे, तर समाजविरोधी गुन्ह्यांचे, अनेक व्यसनांचें आगर तो भाग बनला आहे. या ठिकाणीं मोठमोठ्यांची मुलेंदेखील संगतीनें बिघडतात, हा अनुभव त्यांना स्वतःला आला होता. आणि म्हणून नगररचनेच्या कार्यक्रमात कामाठीपुन्याला अग्र क्रमांक मिळावा, अशी त्यांची रास्त अपेक्षा होती. आज मुंबई शहराचा झपाट्यानें विस्तार होत आहे, सरकारी गृहनिर्माण मंडळाच्या योजनेप्रमाणें नवनवीन वसाहती उदयास येत आहेत, जुन्या, कंगाल व मोडकळीस आलेल्या इमारतींच्या ठिकाणीं नवीन आलिशान इमारती उभारल्या जात आहेत. रस्ते विस्तार पावत आहेत, आजूबाजूचें वातावरण झपाट्यानें सुधरत आहे परंतु सिल्म यांच्या कामाठीपुन्याची पुनर्रचना करण्याची योजना धूळ खात पडली आहे. परंतु शहर सुधारणेचा एकंदर वेग लक्षांत घेतां, सिल्म यांचें सुंदर मुंबापुरीचें स्वप्न त्यांच्या हयातींत पुरें होईल अशी अपेक्षा आपण करूंया.

सिल्म नगरपालिकेमध्यें असतांना त्यांनीं केलेलीं दोन कामें चिरस्मरणीय होऊन राहिलीं आहेत. त्यापैकीं एक म्हणजे भायखळ्यावरील मारुतीचें मंदिर. आज हें मंदिर ज्या ठिकाणीं आहे त्यापेक्षां त्याचा विस्तार कितीतरी मोठा होता व तें रस्ता रुंद करण्याच्या योजनेच्या आड येत होतें. रस्ता रुंद करण्यासाठीं मंदिराच्या चालकांनीं आपली जागा दिली व नगरपालिकेनें तें मंदिर मागें हटवून पुन्हा व्यवस्थित बांधून देण्याचें कबूल केलें. परंतु आपल्या मशिदीसमोर हें मंदिर येत असल्याकारणानें त्यामधील घंटानादामुळें व इतर वाद्यांमुळें आपल्या प्रार्थनेला व्यत्यय येईल, सबब तें बांधलें जाऊच नये, असें हटवादीपणाचें धोरण मुसलमान समाजांतील कांहीं अविचारी गटांनीं अंगिकारलें. त्यामधून जातीय दंग्याचा भडका उडाला. तो तीन महिने चालला व त्यांत उभय पक्षांचीं सुमारें ३०० माणसें मृत्युमुखी पडलीं.

त्या वेळीं मुंबई नगरपालिकेचे महापौर डॉ. जमनादास मेहेता होते. नानासाहेब मोडक सिटी इंजिनिअर होते. आणि हिंदूंच्या बाजूनें तेरसी, गोवर्धनदास, दंतवैद्य सावरकर

व स्वतः सिल्म यांनी नेट लावला होता. बॅ. जमनादास म्हणाले, "हें मंदिर बांधून देण्यास नगरपालिका कायद्यानें वचनबद्ध झाली आहे. तेव्हां तें बांधून दिलें गेलेंच पाहिजे.'

परंतु हें मंदिर बांधून देण्यास कोणी कॉन्ट्रॅक्टर मिळेना, मजूर मिळेनात. कारण मुसलमानांतील कांहीं आक्रमक व हिंसाखोरी गटांनी त्या बांधकामांत अत्याचारी मार्गांनी व्यत्यय आणण्यास सुरवात केली. तेव्हां टेलगू समाजांतील कांहीं मान्यवर नेते सिल्म यांना म्हणाले-आमच्या मोहल्ल्यांत बांधकाम करणारे मजूर पुष्कळ आहेत. त्यांना जर पोलिसांकडून संरक्षण मिळालें, तर केशवराव वकील हें मंदिर बांधून देण्याची जबाबदारी स्वीकारण्यास तयार आहेत. ते तीन महिन्यांत मंदिर बांधून देतील. सिल्म यांनी पुढाकार घेऊन तें मंदिर बांधून देण्याची तयारी दर्शविली. तेव्हां नानासाहेब मोडक हिंमत बांधून त्या कामाला लागले आणि पोलीस संरक्षणाखाली तें मंदिर ठरलेल्या मुदतीत उभें राहिलें. आज तें मंदिर मशिदीच्या तोंडावर असून, त्याची एकहि वीट हलविण्याची हिंमत आततायी मुसलमान बांधवांना झालेली नाहीं. त्यावेळीं सिल्म यांनी धडाडी दाखविली नसती तर १९३६ सालीं हें मारुतीचें मंदिर पुरें झालें नसतें.

सिल्म यांची दुसरी संस्मरणीय कामगिरी म्हणजे चौपाटीवरील आजचा लोकमान्य टिळकांचा पुतळा. ज्या ठिकाणीं टिळकांचें दहन झालें त्या ठिकाणींच हा पुतळा उभारण्यांत यावा अशी सूचना खुद्द सिल्मनीं 'बॉम्बे क्रॉनिकल' मध्ये पत्र लिहून केली. परंतु तें कार्य नेटानें पार पाडण्यासाठीं परिणामकारक अशी यंत्रणा नव्हती. अशा वेळीं स्वतः सिल्म पुढें झाले व त्यांनीं त्या पुतळा समितीचें चिटणीसपद आनंदानें स्वीकारलें. त्या कार्यांत गोपाळराव देशमुख, बाळासाहेब खेर प्रभृती मंडळी होतीच. परंतु रमतानंद अनंतराव गद्रे म्हणतात त्याप्रमाणें चौपाटी हा पुतळा सिल्म यांच्या अविरत व चिकाटीच्या प्रयत्नामुळेंच उभारला गेला हें अगदीं खरें आहे. हा पुतळा उभारण्याच्या कार्यांत हातभार लावून सिल्म यांनीं लोकमान्य टिळकांवरील आपली प्रगाढ भक्ती व्यक्त केली.

मुंबई नगरपालिकेंत सतत २४ वर्षें काम करून देखील सिल्म यांना महापौर बनण्याचा मान मिळाला नाहीं. शेवटीं शेवटीं ते स्टॅण्डिंग कमिटीचे-स्थायी समितीचे अध्यक्ष झाले होते आणि स्थायी समितीचा अध्यक्ष शेवटीं मेयरच्या खुर्चीवर जाऊन बसतो असा दंडक आहे. त्यावेळीं सिल्म मुंबई विधान सभेवर निवडून गेले होते. आणि कॉंग्रेस श्रेष्ठींनीं आदेश दिला होता कीं, कॉंग्रेसजनांनीं एकाच वेळीं नगरपालिका व विधान सभा अशा दोन ठिकाणीं राहूं नये; एका जागेचा राजिनामा द्यावा आणि म्हणून कॉंग्रेस श्रेष्ठींच्या आदेशाप्रमाणें सिल्म यांनीं १९४६ सालीं नगरपालिकेंतील सभासदपदाचा राजिनामा दिला. अशा रीतीनें महापौर होण्याची त्यांची संधी हुकली. परंतु त्याचवेळीं मुंबई विधान सभेंतील कॉंग्रेस पक्षाची प्रतोद बनण्याची संधी त्यांना लाभली. ती कामगिरी त्यांनीं उत्तम रीतीनें बजावली.

# काँग्रेसमधील कामगिरी

आजकाल निष्ठा ही तकलुपी बाब बनली आहे. स्वार्थासाठीं पक्ष व निष्ठा बदलणाऱ्या व पक्षांतर करून सत्तास्थानी जाऊन बसणाऱ्या राजकारणी पुरुषांचें पेंव देशांत सर्वत्र फुटलें आहे. पक्षाची शिस्त मोडणें ही नित्याची बाब बनूं पहात आहे आणि वारा वाहील तशी पाठ फिरविणें, ही आजकालची राजनीति झाली आहे. परंतु सिलम ह्या सर्व गोष्टींपासून आजतागायत निर्लेप राहिले आहेत. काँग्रेसवरील त्यांची भक्ति अव्यभिचारी आहे, त्यांची निष्ठा अढळ आहे, कोणत्याहि प्रकारच्या प्रलोभनानें ती कधीं डागाळली नाही. सत्ता मिळविण्यासाठीं धडपड करावयाची नाहीं, मिळालेली सत्ता टिकविण्यासाठीं कारवाई करावयाची नाहीं आणि कोणाच्या कारवाईमुळें सत्तेच्या स्थानावरून बाजूला व्हावें लागलें तरी त्याबद्दल विषाद नाहीं, तक्रारीची भाषा नाही, वरिष्ठ श्रेष्ठींना आदेश विनतक्रार पाळावयाचा, हे सिलम यांच्या जीवनांतील पैलू, आजकालच्या राजकारणी पुरुषांत दुर्मीळ होत चालले आहेत आणि सत्तास्पर्धेच्या व कुटील कारवायांच्या राजकारणाला ऊत आला आहे. या सर्व राजकारणापासून सिलम अगदीं कटाक्षानें दूर राहिले आहेत.

आजकाल 'राजकारणी पुरुष' या शब्दप्रयोगाची जी व्याख्या होते त्या अर्थानें सिलम राजकारणी पुरुष आहेत, असें मला वाटत नाहीं. राजकारण हा ज्याचा अंतिम तोडगा आहे असें वाच्यार्थानें अथवा लाक्षणिक अर्थानें मानलें जातें तो सिलम यांचा प्रकृतिधर्म कधींच नव्हता. ते खऱ्याखुऱ्या अर्थानें महात्मा ज्योतिबा फुले, समाजसुधारक आगरकर, कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे आदि समाजसुधारणाग्रणींच्या कोटींतील पुरुष आहेत. आपल्या तेलगू समाजबांधवांची सेवा करण्यासाठीं त्यांनीं विद्यार्थीदशेपासून त्या कार्याला वाहून घेतलें. स्वबांधवांची सेवा करतां करतां, त्यांच्या मनावर तत्कालीन संस्कारक्षम विद्यार्थ्यांप्रमाणें लोकमान्य टिळकांच्या राजकारणाचा पगडा बसला, तो मुळच मुळीं दादाभाई नवरोजी, लोकमान्य टिळक, वाळकर्ते परांजपे, समाजसुधारक आगरकर यांचें होतें. विद्यार्थी सिलम यांच्या मनावर या सर्व थोर पुरुषांच्या शिकवणीचा परिणाम होऊन राहिला होता. थोर पुरुषांचीं चरित्रे त्यांच्या नित्य वाचनांत येत असत. ज्यांनीं आपल्या देशाला स्वातंत्र्य मिळवून दिलें त्याचा कित्ता आपण गिरविला पाहिजे, हें त्यांच्या मनानें घेतलें होतें. आणि आधीं सामाजिक सुधारणा कीं आधीं राजकीय सुधारणा या थोरामोठ्यांच्या वादांत न पडतां त्यांनीं स्वतःला प्रथम सामाजिक सुधारणेला वाहून घेतलें आणि स्वतःच्या समाजापासून त्यांनीं त्या सुधारणेला सुरुवात केली. 'तेलगू बालक ज्ञानोत्तेजक समाज,' 'तेलगू बालक ज्ञानोत्तेजक समाज माला,' 'तेलगू मित्र,' 'राजूबाबाजी वादविवाद मंडळ,' 'धूमय्या येशोनेल डोळ्याचें इस्पितळ,'

'विठ्ठल नारायण सायन्स जिमखाना,' कामाठीपुऱ्यांतील तेलगू मुनुरवार जातीची सात मंदिरें अस्पृश्यांना खुली करणें, दक्षिण हैद्राबादमधील मुंबईंत स्थाईक झालेल्या हिंदूंची हैद्राबाद प्रजा परिषद, अखिल भारतीय तेलगू मुनुरवार जाति-परिषद, सार्वजनिक गणेशोत्सव व शिवराज्याभिषेक दिन वगैरे जे उपक्रम त्यांनी केले ते सामाजिक सुधारणेचे व सामाजिक जागृतीचे द्योतक होते. ते १९२२ सालीं मुंबई नगरपालिकेंत गेले ते आजच्या सारखें राजकारण खेळण्यासाठीं नव्हे, तर मुंबई शहराची तनमनेंकरून सेवा करण्यासाठीं, या शहराच्या समस्या सोडविण्यासाठी. आणि हें करीत असतांना ते कॉंग्रेसच्या राजकारणाकडे स्वाभाविकपणें ओढले गेले. तत्कालीन पिढीचा तो स्वाभाविक पिंडधर्म होता. कॉलेजमध्यें असतांना लोकमान्य टिळकांचीं व्याख्यानें न चुकतां ऐकणारे व दादाभाई नवरोजींना त्यांच्या वाढदिवसानिमित्त पत्र पाठविणारे विलम शेवटीं कॉंग्रेसच्या राजकारणाकडे खेचले जावेत हें स्वाभाविक होय. लोकमान्यांनापासून राजकारणाचा वारसा महात्मा गांधींकडे गेल्यानंतर विलम गांधीजींच्या शिकवणीनें भारावून जावेत हेंदेखील स्वाभाविक होतें. गांधीजी हे केवळ राजकारणी पुरुष नाहींत तर खरेखुरे समाजसुधारक आहेत व त्यांची समाजसुधारणा आपल्या कार्याला पोषक आहे असें त्यांना वाटलें. आणि ज्या गांधीजीमुळें कॉंग्रेससंघटनेला प्रतिष्ठा प्राप्त झाली त्या कॉंग्रेसपक्षांत जाऊन आपण आपलें इप्सित साध्य करून घ्यावें असें त्यांच्या मनानें घेतलें.

गांधीजींचे ते सच्चे शिष्य असल्याची ग्वाही त्यांनीं अस्पृश्यतानिवारणाच्या प्रश्नांत पुढाकार घेऊन दिली होती. मुंबईच्या बहुरंगी, बहुढंगी जीवनांत अस्पृश्यता सामावूं शकत नाहीं, ही गोष्ट त्यांना कामाठीपुऱ्यांमधील आपल्या दीर्घकालीन वास्तव्यांत पटली होती. स्पर्शास्पर्श ही भावना त्यांच्या मनाला कधींच शिवली नाहीं. विल्सन हायस्कूलसारख्या स्पृश्यास्पृश्यता या भेदभावाला थारा नसलेल्या मिशनरी स्कूलमध्यें व नंतर त्याच मिशनरी कॉलेजांत शिक्षण झाल्यामुळें त्यांच्या मनावर ही धर्मातीत भावना ठसली असावी. आणि ज्या धर्मांत आपला जन्म झाला त्या धर्माला लागलेला हा अस्पृश्यतेचा कलंक धुवून काढण्याचा त्यांनीं संकल्प सोडला.

स्वतःच्या समाजाच्या कक्षेंत राहून ते मर्यादित प्रमाणांत समाजसेवा करीत होते हें जरी खरें असलें, तरी मुंबई नगरपालिकेंत गेल्यावर त्यांचें कार्यक्षेत्र सहाजिकच व्यापक झालें होतें. आर्य समाजाची हिंदुधर्म सुधारणेची पुरोगामी चळवळहि त्यांच्या परिचयाची झाली होती. आणि त्याच वेळेला ते हा अनुभव घेत होते कीं, ज्या बहुजन समाजाचे ते घटक आहेत, त्या समाजाचा बुद्धिभेद स्वतःच्या स्वार्थासाठीं करणारे, ब्राह्मण-ब्राह्मणेतर अशा जातीय वादाचें तुणतुणें वाजविणारे कांहीं सरकारजमा झालेले लोक समाजाचा व पर्यायानें देशाचा घात करीत आहेत. त्यांच्यासारखा तेलगू समाजातील सुशिक्षित तरुण आपल्या पक्षाला मिळाला तर ब्राह्मणेतरांच्या पुढाऱ्यांना पाहिजे होता.

परंतु सिलम हे स्वतःच्या देशावर नितांत प्रेम करणारे राष्ट्रीय बाण्याचे समाज-सुधारक होते. त्यांनी हें पाहिलें कीं, ब्राह्मणेतर समाजांतील सरकारमान्य येंडे बहुजन समाजाची दिशाभूल करीत आहेत. यांत देशाचा घात आहे. म्हणून सिलम व त्यांचे सहकारी शंकरराव पुप्पाला, गणपतराव नलावडे, बॅ. डोंगरे, रामचंद्रराव गोळे प्रभृती ब्राह्मणेतर तरुणांनी 'राष्ट्रीय ब्राह्मणेतर संघ' नांवाची ब्राह्मणेतरांतील राष्ट्रीय विचारांच्या तरुणांची संघटणा सरकारमान्य ब्राह्मणेतर बुदुकांना शह देण्यासाठीं सुरू केली. त्यांनी आपल्या या संघटनेमार्फत मुंबई, पुणें, नाशिक वगैरे ठिकाणीं सभा घेऊन त्या सरकारजमा लोकांच्या कारवाया उघडकीस आणल्या. या सभांतहि सिलम यांचें वक्तृत्व विशेष प्रभावी ठरलें. या सर्व मंडळींनी सर मोरोपंत जोशी यांच्या-सारख्या त्या वेळच्या ब्राह्मण पुढाऱ्याच्या अध्यक्षतेखालीं १९२७ सालीं राष्ट्रीय ब्राह्मणे-तरांची परिषद भरवून हें दाखवून दिलें कीं, या महाराष्ट्रांतील सर्वच ब्राह्मणेतरांनीं सरकारकडे आपली बुद्धि गहाण टाकलेली नाहीं; तर देशांत ज्या पुरोगामी शक्ती आज काम करीत आहेत, देशाच्या स्वातंत्र्यासाठीं लढत आहेत, त्यांच्या पाठीशीं ब्राह्मणेतर समाज उभा आहे. ही सारी राष्ट्रीय बाण्याची ब्राह्मणेतर मंडळी शेवटीं सिलम-पुप्पाला यांच्या नेतृत्वाखालीं कॉंग्रेस पक्षांत गेली. तेलगू समाजाला कॉंग्रेस संघटनेमध्यें आणण्याचें आणि कामाठीपुरा हा कॉंग्रेसच्या चळवळीचें एक प्रभावी केंद्र बनविण्याचें श्रेय या राष्ट्रीय बाण्याच्या तेलगू पुढाऱ्यांना दिलें पाहिजे.

आपल्या पाठीमागें आपला समाज आहे, या आत्मविश्वासानें सिलम नंतर समाज-सुधारणेच्या कार्याला लागले. त्यांनी हिंदू समाजाला लागलेला अस्पृश्यतेचा कलंक धुऊन काढण्याचा संकल्प केला. आणि कोणत्याहि सुधारणेला आपल्या घरापासून प्रारंभ करावा या भूमिकेवरून त्यांनीं आपल्या तेलगू मुनुरवार ज्ञातीचीं कामाठीपुऱ्यांतील सात मंदिरें अस्पृश्यांना खुलीं करण्यासाठीं चळवळ आरंभिली. सिलम-पुप्पाला यांच्या त्या चळवळीला यश येऊन देवळांच्या ट्रस्टींनीं तीं देवळें अस्पृश्यांना खुलीं करण्याचें कबूल केलें. पुढें पं. मदनमोहन मालवीय यांच्या अध्यक्षतेखालीं समारंभपूर्वक हीं मंदिरें अस्पृश्यांसाठीं खुलीं करण्यांत आलीं. तेलगू समाजानें आपल्या या सत्कृत्यानें मुंबई शहरांतील इतर समाजांना कित्ता घालून दिला. परंतु इतर समाजांना सिलम व पुप्पाला यांच्यासारखे पुढारी न लाभल्याकारणानें त्यांच्या कक्षेतील मंदिरें अस्पृश्यांसाठीं खुलीं करण्याकरितां चळवळ उभारावी लागली.

या लोकविलक्षण घटनेमुळें सिलम यांचें नांव अस्पृश्योद्धाराच्या चळवळींत सर्वतोमुखीं झालें. मुंबईच्या हरिजन सेवक संघाचें नेतृत्व त्यांच्याकडे स्वाभाविकपणें चालून आलें. अस्पृश्योद्धाराच्या चळवळींतील अनेक पुढारी त्यांना येऊन मिळाले व हरिजनांना असें वाटूं लागलें कीं, सिलम हे कृतिशूर पुढारी आहेत. मुंबईतील अस्पृश्यांना कॉंग्रेस पक्षांत आणण्यास सिलम यांचे प्रयत्न कारणीभूत झाले आहेत, हें आज कोणाला नाकारतां येणार

नाहीं. आज नारायणराव काजरोळकर यांच्यासारखे लोकसभेचे मान्यवर नेते सिल्मना आमंत्रण मानतात. जगजीवनराम यांची तर त्यांच्यावर भारी भिस्त आहे. आणि केंद्र सरकारची अस्पृश्यासंबंधीची कोणतीहि योजना असो, त्यामध्यें सिल्म यांना स्थान नाहीं, असें सहसा होणें शक्य नाहीं.

सिल्म हे केवळ अस्पृश्यांचे कैवारी नाहींत, तर ते समस्त पददलित व मागास समाजाचे मोठे आधारस्तंभ आहेत. मुंबई सरकारनें आपल्या 'बॅकवर्ड क्लास बोर्डा'चें सभासदपद देऊन त्यांना मागास समाजाची सेवा करण्याची संधी दिली.

अशी तपःश्चर्या पाठीशीं असलेल्या सिल्म यांच्यासारखा कार्यकर्ता काँग्रेस संघटनेमध्यें मूर्धस्थानीं जाऊन बसावा हें स्वाभाविक होय. स. का. पाटील यांच्या तीक्ष्ण नजरेतून त्यांची देशसेवा निसटणें शक्य नव्हतें. मुंबई नगरपालिकेंतील त्यांची कामगिरी त्यांनी अगदीं जवळून पाहिली होती. त्यांचें संघटनाकौशल्य काँग्रेसच्या प्रत्येक चळवळींत त्यांच्या प्रत्ययास आलें होतें. १९४१ मध्ये वैयक्तिक सत्याग्रहाच्या चळवळींत भाग घेतल्याबद्दल त्यांना एक वर्ष स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें होतें, तर १९४२ सालच्या 'चले जाव' च्या आंदोलनांत त्यांना दोन वर्षें येरवड्यास स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें होतें.

सिल्मांच्या या तपश्चर्येनें त्यांना मुंबई प्रदेश काँग्रेस समितीचें उपाध्यक्षपद १९४१ सालींच मिळवून दिलें होतें. पुढें १९४६ ते १९४९ या तीन वर्षांत त्यांनीं मुंबई काँग्रेसचें चिटणीसपद भूषविलें. या चिटणीसपदावरून ते १९४६ सालीं मुंबई विधानसभेवर गेले.

वास्तविक मुंबई विधानसभेमध्यें जाण्यासाठीं त्यांना १९३७-३८ सालींच परवाना मिळाला होता, असें म्हटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. १९३७-३८ सालीं मुंबईमध्यें काँग्रेसची राजवट सुरू झाली. त्याचवेळीं त्यांच्याकडे संघटनेचें लक्ष गेलें होतें. अस्पृश्योद्धाराच्या चळवळींतील सिल्म यांची कामगिरी काँग्रेसश्रेष्ठींसमोर होतीच. शिवाय १९३०-३२ सालच्या आंदोलनांत दारूचे गुत्ते व ताडीचे पिठे यांच्यासमोरील निरोधनाच्या वेळीं सिल्मनीं बजावलेली कामगिरीहि त्यांच्यासमोर होती. दारूबंदी हें त्यांचें एक आवडतें सामाजिक कार्य असल्याचा प्रत्यय यापूर्वीच आला होता. म्हणून जेव्हां मुंबई शहरांत दारूबंदीची अंमलबजावणी करण्याचें ठरलें तेव्हां त्यासाठीं नेमण्यांत आलेल्या 'समारोह समिति'चें अध्यक्षपद त्यांना देण्यांत आलें. बृहन्मुंबई दारूबंदी समितीचे ते सभासद झाले. आणि पुढें जेव्हां नशाबंदी मंडळाची स्थापना झाली तेव्हा ते तिचे अध्यक्ष बनले. या नशाबंदी मंडळानें दारूबंदीला पोषक असा प्रचार करून काँग्रेसच्या दारूबंदीच्या धोरणाचा निष्ठेनें पाठपुरावा केला आहे. सिल्मनीं जणूं काय त्या कार्यास वाहून घेतलें आहे. मध्यंतरी २६ फेब्रुवारीला महाराष्ट्र राज्य नशाबंदी परिषदेचें अध्यक्षपद भूषविण्यासाठीं सिल्मना मुद्दाम पाँडेचरीहून बोलावण्यात आलें.

सांगावयाचें तात्पर्य काय की-काँग्रेसच्या चळवळीचीं जी सामाजिक अंगें उपांगें आहेत त्यांत सिम्म विशेष रंगून जातात. राजकारणाच्या रंगढंगांत दंग होऊन जाण्यापेक्षां, उपरोक्त स्वरूपाच्या राजकारणातीत सामाजिक कार्यांत समरस होण्यास त्यांना विशेष आनंद होतो, हें त्यांच्या समवेत वसणाऱ्या त्यांच्या सर्व हितचिंतकांना, चहात्यांना व मित्रांना ठाऊक आहे. त्यामुळें राजकारणांत अपयश आलें म्हणून पश्चात्ताप करण्याची त्यांच्यावर कधीं पाळी आली नाहीं व येण्याचा सुतराम् संभव नाहीं !

: ५ :

## विधानसभेंत—

१९४६ सालीं सिम्म मुंबई विधान सभेचे सभासद झाले त्या वेळीं त्यांच्या वयाला ५० वर्षे झालीं होतीं. त्या पचास वर्षांपैकीं तब्बल २४ वर्षे त्यांनीं मुंबई नगरपालिकेसारख्या स्थानिक स्वराज्य संस्थेंत विविध प्रकारचीं जबाबदारीचीं पदें भूषविलीं होतीं. त्यापूर्वी वयाच्या बाराव्या वर्षी विद्यार्थीदशेंतच स्वतःच्या समाजाची सेवा करून त्यांनीं लोकमान्यता मिळविली होती. आणि काँग्रेस संघटनेमध्यें राहून देशांतील बहुतेक मोठ्या पुढाऱ्यांचें त्यांनीं जवळून दर्शन घेतलें होतें, त्यांचें कार्य जवळून पाहिलें होतें. त्यांच्यापैकीं अनेकांचा त्यांना अगदीं निकटचा सहवास लाभला होता आणि कांहीं जणांशीं तर त्यांनीं प्रत्यक्ष विचारविनिमय करून आपल्या ज्ञानांत भर घातली होती. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे त्या वेळच्या मुंबईच्या विधान सभेंत त्यांच्या तोडीचा सभ्यसाची व अनुभवी आमदार एखाद दुसरा अपवादानें असला तर असेल. अशा सभ्यसाची सभासदावर काँग्रेस पक्षाच्या प्रतोदाची जबाबदारी टाकण्यांत आली. विडे विडे मतिर्भिन्नः अशा आमदारांना सांभाळणें, नव्हे त्यांना सांभाळून घेणें व विधानसभेंतील कामकाजांत त्यांना सदैव दक्ष ठेवणें, सभागृहांत गणसंख्या राहील अशी काळजी वहाणें आणि मतदानाच्या वेळीं सर्व सभासदांना सभागृहांत हजर ठेवणें वगैरे कितीतरी अवधानें प्रतोदाला सांभाळावीं लागतात. फार काय एखाद्या खात्याचा प्रश्न चर्चेला आलेला असतांना तो मंत्री त्यावेळीं सभागृहांत हजर राहील अशी खबरदारी घेणें, प्रसंगविशेषीं त्याला आवश्यक ती माहिती मिळेल अशी व्यवस्था ठेवणें, विरोधी पक्षाच्या हल्ल्याला तोंड देण्यासाठीं कोणत्या सभासदाला पुढें करावें ही समयसूचकता असणें, आणि प्रतिपक्षाच्या गोटातील माहिती सावधगिरीचा उपाय म्हणून अगोदर मिळविणें, वगैरे कितीतरी अवधानें व पथ्यें सांभाळावीं लागतात. सिम्म यांनीं ही कामगिरी एक नाहीं तर सतत नऊ वर्षे उत्तम रीतीनें पार पाडली, आणि आपल्या गुर्जर व मराठी मंत्र्यांची मर्जी सांभाळण्यांत यश मिळविलें. विशेषतः मोरारजीभाई देसायांसारख्या चोखंदळ मुत्सद्याला त्यांची योग्यता विशेषत्वानें पटली. आणि जेव्हां मोरारजीभाई मुंबईच्या राजकारणांतून

बाहेर पडले तेव्हां सिडमसंबंधी दोन चांगले शब्द आपल्या वारसाकडे म्हणजे यशवंतराव चव्हाणांकडे बोलले असावेत, सिल्म यांचा उपयोग करून घेण्यास त्यांना सांगितलें असावें, असें पुढें जें घडलें त्यावरून दिसतें.

सिल्म ह आदर्श प्रतोद होते हें आजच्या परिस्थितींत निर्विवादपणें सिद्ध झालें आहे. गणसंख्येच्या अभावीं विधान सभेचें कामकाज तहकूब झालें असें सिल्म यांच्या कारकीर्दीत कधीं घडलें नाहीं. तसेंच एखाद्या खात्याच्या चर्चेच्या वेळीं संबंधीत मंत्री गैरहजर राहिला आहे व सभासदांनीं कानपिचक्या दिल्या आहेत, असा प्रसंग तर कधींच निर्माण झाला नाहीं. अथवा सभासदांनीं आपल्या प्रतोदाचा आदेश धुडकावून लावला आहे, असें तर कधींच घडलें नाहीं. आजच्या परिस्थितींत या गोष्टींचें महत्त्व निःसंशय दुणावलें आहे व आज असें म्हणण्याची पाळी आली आहे कीं, सिल्म यांच्या योग्यतेचा प्रतोद भविष्यकाळांत कॉंग्रेस पक्षाला मिळेल कीं नाहीं याची शंका वाटते. असो.

पुढें ता. १ नोव्हेंबर १९५६ सालीं यशवंतराव चव्हाण द्विभाषिक मुंबई राज्याचे मुख्य मंत्री झाले. त्या वेळीं सिल्म यांच्या मित्रांची व चहात्यांची अशी अपेक्षा होती कीं, त्यांना द्विभाषिक मुंबई राज्याच्या मंत्रिमंडळांत घेण्यांत येईल. कांहीं जणांची तर अशी अपेक्षा होती कीं, त्यांच्याकडे मजूरखातें देण्यांत येईल. आणि असें करण्यांत कांहीं गैर नव्हतें. मजूरचळवळीशीं त्यांचा संबंध आलेला होता. बॉम्बे ऑटोमोबाईल एम्प्लॉईज युनियन व बॉम्बे इन्शुरन्स एम्प्लॉईज् युनियनचे अध्यक्ष या नात्यानें त्यांनी बजावलेली कामगिरी जनतेसमोर होती कामगारांच्या विविध संघटना मार्गदर्शनासाठीं त्यांच्याकडे येत असत. कोणाहि मजुराला आपलें गाऱ्हाणें त्यांच्याकडे घेऊन जाण्यास दिक्कत वाटत नसे व तेदेखील त्यांच्या कामांत आस्थेनें लक्ष घालून त्यांना शक्य ती मदत करीत असत. बहुजन समाजाचे ते सर्वसिद्ध असे नेते होते. अस्पृश्य समाज व पददलित समाज यांच्या-बद्दल त्यांच्या अंतःकरणात सदैव वसत असलेल्या कणव तर सर्वश्रुत होता. तेव्हां ते एक आदर्श मजूर मंत्री होऊं शकतील, असें त्यांच्या चहात्यांना वाटत होतें.

परंतु सिल्म यांना स्वतःच्या निंदधर्माची पूर्ण जाणीव होती. त्यांना मजूर काय कोणतेंच खातें मानवण्यासारखें नव्हतें. मंत्र्याला पदोपदीं शब्दांची कसरत करावी लागतें, सत्य वचनाला मुरड कशी घालावी लागते, प्रसंग विशेषीं पोकळ आश्वासन देऊन वेळ कशी निभावून न्यावी लागते, विहीत मार्गाच्या बाहेर कसें जावें लागतें याचा अनुभव त्यांनीं अगदीं जवळून घेतला होता. तेव्हां मजूरच काय, परंतु इतर कोणतेंच खातें ते स्वीकारणें शक्य नव्हतें. परंतु मोरारजीभाई यांनीं केलेल्या शिफारशीप्रमाणें त्यांची सोय लावणें यशवंतरावांना भाग होतें आणि त्यांनीं मोठ्या दूरदर्शीपणानें त्यांना सभापतीचें पद देण्याचें ठरविलें. आपल्या प्रकृतिधर्माला साजेसें हें पद आहे, यांत पक्षपाताला स्थान नाहीं, निःस्पृहपणें व न्यायीपणानें वागतां येईल, राजकारणांतील सभ्यपणा करण्याचा

प्रसंग येणार नाहीं, आणि सर्वांना समान भूमिकेवरून वागवतां येईल, असें सिलम यांच्या मनानें घेतलें व त्यांनीं त्या पदाचा स्वीकार केला.

मुंबई विधानसभेचें अध्यक्षपद, दादासाहेब मावळणकर, कुंदनमल फिरोदिया व द. का. तथा नानासाहेब कुंटे यांनीं यापूर्वी भूषविलें होतें. त्या प्रत्येकानें स्वतःची अशी चांगली परंपरा निर्माण केली होती, लोकशाही कार्यपद्धतीचा, संसदीय रीतिरिवाजांचा चांगला पायंडा पाडला होता. त्याला अनुसरूनच सिलम यांना पुढें जावयाचें होतें. त्यांच्या मार्गांत अनेक अडचणी होत्या, अनेक पेचप्रसंगांना त्यांना तोंड द्यावयाचें होतें. मुंबई राज्यांत संयुक्त महाराष्ट्राची चळवळ चालू होती. महागुजरातची चळवळ चालू होती. मुंबईचें द्विभाषिक राज्य राबविण्याची अतिशय नाजुक जबाबदारी यशवंतराव चव्हाणांवर होती. विधान सभेतील वातावरण संघर्षमय होतें. भडका केव्हां उडेल याचा नेम नव्हता. अशा वेळीं सिलमनीं आपल्या सौजन्यशील वागणुकीनें, मनमिळावू स्वभावानें आणि उभयपक्षांच्या तीव्र भावना लक्षांत घेऊन सर्वांना सांभाळून घेतलें. विधानसभागृहाबाहेर द्विभाषिक मोडण्याचें आंदोलन तीव्रतर होत गेलें तरी त्याची झळ विधान सभेच्या कामकाजाला लागणार नाहीं, अशी खबरदारी सिलमनीं घेतली. परंतु शेवटीं स्फोट व्हावयाचा तो झालाच. राज्यपालांच्या भाषणाच्या वेळीं संयुक्त महाराष्ट्राच्या घोषणांनीं सभागृह दणाणून गेलें, त्यानंतर सभागृहांतून संयुक्त महाराष्ट्राच्या गर्जना झाल्या. परंतु सिलम यांनीं मोठ्या कौशल्यानें वेळ निभावून नेली. त्यावेळीं स्वतःबरोबर सभागृहाचीहि प्रतिष्ठा त्यांनीं सांभाळली आणि कोणत्याहि प्रसंगीं सत्तारूढ पक्ष व विरोधी पक्ष यांच्यामध्यें कटुता निर्माण होऊं दिली नाहीं.

सिलम यांच्या कारकीर्दीत विधान सभेचें स्वतंत्र असें सचिवालय आकारास आलें. आमदारांमध्यें अभ्यास वृत्ती वाढीला लागावी, त्यांना सर्व प्रकारचे संदर्भ ग्रंथ उपलब्ध व्हावेत, कोठें काय आलें आहे, त्याची सर्व माहिती एकत्र मिळावी, अशी सोय त्यांनीं केली. विधानसभेचें जें ग्रंथालय नानासाहेब कुंटे यांच्या कारकीर्दीत वाढीला लागलें होतें तें सिलमांच्या कारकीर्दीत पूर्णत्वाला पोचलें.

सिलमांची दुसरी महत्त्वाची कामगिरी म्हणजे 'एस्टिमेट कमिटी' व 'पब्लिक अकाऊन्ट्स कमिटी' यांचें अध्यक्षपद अर्थमंत्र्याला देण्याची प्रथा मोडून तें बिनसरकारी इसमाला देण्याचा त्यांनीं पाडलेला पायंडा. त्यामुळें या दोन समित्यांना वसें वजन प्राप्त झालें आहे व सरकारलाहि त्यांचा कसा वचक बसला आहे, याचा अनुभव आज विशेष करून येत आहे.

सिलमांच्या कारकर्दीत आमदार निवासाची वास्तु निर्माण झाली. हें निवासस्थान सभापतीच्या अखत्यारांत होतें. आमदारांच्या कांहीं अडीअडचणी असल्या, कॅन्टिन चालविणाऱ्या कॉन्ट्रॅक्टरबाबत कांहीं तक्रारी आल्या, तर त्यांत ते तत्परतेनें लक्ष घालीत

असत आणि आमदार निवासाचा गैरफायदा कोणी घेऊं नये व त्या ठिकाणीं कांहीं गैरप्रकार होऊं नये म्हणून ते विशेष खबरदारी घेत असत म्हणून त्यांच्या कारकीर्दीत कसलाहि अनुचित प्रकार कधीं घडला नाहीं व त्याचे पडसाद वृत्तपत्रांतून उमटले नाहींत.

१९६० सालीं महाराष्ट्र राज्याची निर्मिती झाल्यानंतर या मराठी राज्याचा कारभार लौकरांत लवकर मराठी भाषेंतून सुरू झाला पाहिजे याबाबतींत ते स्वतः विशेष दक्ष होते. ते स्वतः अनेक भाषाकोविद होते. मराठी, गुजराती, हिंदी व इंग्रजी या चारी भाषांवर त्यांचें चांगलेंच प्रभुत्व होतें. परंतु महाराष्ट्र राज्य होतांच त्यांनीं मराठी भाषेला प्राधान्य दिलें. संसदीय भाषेचा शब्दकोश मराठींत तयार करण्याचें महत्त्व त्यांना पटलें व ते त्या दृष्टीनें प्रयत्नाला लागले. त्याचें प्रत्यक्ष फळ म्हणजे 'पदनाम कोश' व 'प्रशासन वाक्प्रयोग' हे दोन ग्रंथ होत. आतां ता. १ मे १९६६ सालापासून मराठी भाषेंतून महाराष्ट्र राज्याचा कारभार सुरू झाला आहे, याचें श्रेय सिलम यांच्या या प्रयत्नांना दिलें पाहिजे.

: ६ :

## विविध क्षेत्रांतील कार्य

आपल्या सत्तर वर्षांच्या प्रदीर्घ आयुष्यांत सिलम यांनीं इतक्या क्षेत्रांत कार्य केलें आहे कीं, त्या सर्वांचा परामर्श ह्या मोटक्या चरित्रांत घेणें येणें कठीण आहे. त्यांच्याबरोबर ज्यांनीं काम केलें अशा त्या त्या क्षेत्रांतील अधिकारी व्यक्तींचे लेख या ग्रंथांत अन्यत्र दिले आहेत, त्यावरून वाचकांना त्यांच्या विविधस्पर्शी कार्याच्या व्यापाची कल्पना येऊं शकेल. बहुतेक क्षेत्रांतील त्यांची भूमिका प्रवर्तकाची आहे. बहुतेक लेखकांनीं त्यांच्या कार्याचा विस्तृत आढावा घेतला आहे. तेव्हां मी त्या गोष्टींची पुनरावृत्ती करीत नाहीं. फक्त त्यांची थोडक्यांत नोंद करतों.

१. ज्ञातीकार्य : सिलम यांनीं आपल्या सार्वजनिक आयुष्याला प्रारंभ स्वतःच्या तेलगू मुनुरवार ज्ञातीच्या कार्यानें केला. त्या समाजामध्यें तंटे बखेडे निर्माण होऊन तीन तट पडले होते. पुणें-मुंबई-नागपूर येथील लोकांनीं आपले सवते सुभे पाडले होते. तीं भांडणें मिटविण्यांत सिलम यांनीं पुढाकार घेतला. आणि १९४० सालीं बडोद्याचे राजाराम रावतल यांच्या अध्यक्षतेखालीं ही परिषद यशस्वी रीतीनें पार पडली.

अशा परिषदा मुंबईत व हैद्राबाद या ठिकाणीं भरविण्यासाठीं त्यांनीं पुढाकार घेतला. त्यांच्याच प्रयत्नामुळें सोलापूर, अहमदनगर, पुणें, मुंबई, नागपूर वगैरे ठिकाणचा तेलगू समाज महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनांत समरस होऊन गेला आहे. सिलम यांची ही कामगिरी प्रशंसनीय आहे.

२ हरिजन सेवक संघ : अस्पृश्योद्धाराच्या कार्याला तर सिलम यांनीं विद्यार्थी-दशेपासून वाहून घेतलें आहे. मुंबईच्या हरिजन सेवक संघाचें कार्य त्यांच्या मार्गदर्शना-खालीं उत्तम चाललें आहे.

३ मागास समाजाचें कार्य : हरिजनांबरोबरच इतर मागासलेल्या जातींच्या कार्यांतहि त्यांनीं लक्ष घातलें आहे. मुंबई सरकारनें मागास जातींसाठीं एक 'बॅक्वर्ड क्लास् बोर्ड' नांवाचें मंडळ निर्माण केलें होतें, त्याचे ते सभासद होते.

४ समाज शिक्षण : निरक्षरतेचें निर्मूलन करण्यासाठीं सिलम यांनीं जेवढे प्रयत्न केले आहेत तेवढे दुसऱ्या कोणी केले असतील असें मला वाटत नाहीं. मुंबईंतील साक्षरताप्रसाराला संघटित स्वरूप त्यांनीं दिलें, असें म्हटलें तर ती अतिशयोक्ति होणार नाहीं त्यांच्या व त्यांच्या सहकाऱ्यांच्या कार्याची साक्ष देण्यास 'समाज शिक्षण मंदिरा'ची वास्तु आज प्रत्यक्षांत उभी आहे.

५ दारुबंदी : मुंबई सरकारनें दारुबंदीचा कायदा जारी करण्यापूर्वीं कितीतरी वर्षे अगोदर विद्यार्थीदशेमध्यें सिलम यांनीं दारूच्या घातकी व्यसनाविरुद्ध शस्त्र उपसलें. पुढें मुंबई सरकारनें तो कायदा केल्यानंतर दारुबंदीच्या निरनिराळ्या समित्यांवर त्यांनीं काम केलें. १९३७-३८ सालीं तर ते 'प्रोहिबिशन कमिशनर' म्हणजे दारुबंदी अधिकारी होते. 'नशाबंदी मंडळ' या संघटनेचे ते अध्वर्यू आहेत. समस्त भारतांत दारुबंदी हें त्यांनीं आपलें जीवितध्येय मानलें आहे.

६ बलोपासनेला उत्तेजन : सुदृढ व निकोप पिढी निपजावी या गोष्टीवर सिलम नेहमींच भर देत आले आहेत. त्यामुळें शारीरिक शिक्षणाच्या सर्व उपक्रमांत ते आस्थापूर्वक लक्ष घालीत असतात. सोलापूरसारख्या दूरच्या तालीम-संघामध्यें जसें त्यांचें लक्ष आहे तसें कुस्तीगीराच्या संघटनेमध्येंहि त्यांचें लक्ष आहे. तालीमबाज लोक त्यांना नेहमींच आवडतात आणि त्यांच्या कोणत्याहि कार्यासाठीं त्यांचा दरवाजा खुला असतो.

७ भारत सेवक समाज : भारत सेवक समाजाच्या स्थापनेपासून त्यांचा त्या संस्थेच्या कार्याशीं संबंध आलेला आहे. राजकारणातीत भूमिकेवरून कार्य करणारी ही एक उपयुक्त संस्था असून तिचें कार्यक्षेत्र अखिल भारतीय स्वरूपाचें आहे.

८ कलानगर : आज वांद्र्याच्या खाडीच्या परिसरांत "कलानगर" ही कलावंतांची वसाहत आकारास आली आहे. या वसाहतीच्या निर्मितीचें श्रेय सिलम यांना दिलें पाहिजे. जे. जे. स्कूल ऑफ् आर्टच्या उपक्रमांत त्यांचा वारंवार संबंध आलेला आहे. ते कलेचे मोठे भोक्ते असून कलावंतांना सहाय्य करण्यास ते सदैव तत्पर असतात.

सिल्म यांनीं आपल्या कारकीर्दींत इतक्या शिक्षणसंस्थांना उपकृत करून ठेवलें आहे कीं, त्यांची एक यादीच सादर करावी लागेल. समस्त समाजाला ज्ञानी करून सोडावें, या देशांत एकहि माणूस निरक्षर रहावां कामा नये, या गोष्टींवर त्यांचा विशेष भर आहे. राजकारणापेक्षां समाजकारणासाठीं व समाजकारणापेक्षां ज्ञानकारणासाठीं आपल्या सर्व शक्ती पणास लावण्यास सिल्म सदैव तयार असतात. राजकारणाच्या व्यापांतदेखील ते अद्याप निर्लेप राहिले आहेत, त्यांच्या ठिकाणचा समाजसेवक सदैव जागृत राहिला आहे, ही माझ्या दृष्टीनें विशेष महत्त्वाची गोष्ट होय.

**: ७ :**

## कौटुंबिक जीवन

सिल्म हे समाजसेवक आहेत, समाजसुधारक आहेत, राजकारणी पुरुष आहेत, गुणी जनांचे चहाते आहेत, संसदीय लोकशाहीचे महान पुरस्कर्ते आहेत, घटनाशास्त्रज्ञ आहेत, वगैरे कितीतरी विशेषणांनीं त्यांना गौरविलें, तरी त्यांचें तें वर्णन शेवटीं अपुरेंच ठरतें. या सर्व विशेषणांपलीकडे शेवटीं सिल्म उरतातच. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाला पूर्णत्व देण्यासाठीं शेवटीं आवर्जून सांगितलें पाहिजे कीं, सिल्म हे एक थोर सज्जन गृहस्थ आहेत, चारित्र्यसंपन्न आहेत, कुटुंबवत्सल आहेत आणि गांधीजींप्रमाणें एक थोर हिंदू आहेत.

सिल्म उग्रमूर्ति वाटतात, त्यांचें कणखर शरीर, धिप्पाड देह, वक्र मुंवया, भेदक नजर, धारदार करडी वाणी, आणि विशेष म्हणजे त्यांच्या भरदार मिशांचे ते दोन आकडे यामुळें प्रथमदर्शनी त्यांच्याबद्दल दरारायुक्त भीति मनस्थाच्या मनांत निर्माण झाल्याशिवाय रहात नाहीं. तसे ते कडक स्वभावाचे आहेत, करड्या शिस्तीचे भोक्ते आहेत, त्यांना गैरवर्तन खपत नाहीं. कोणी लबाडी केली तर आवडत नाहीं, हें सारें खरें असलें तरी ते तितकेच प्रेमळ आहेत, हें फक्त त्यांच्या निकटवर्तियांनाच ठाऊक आहे. त्यांच्या उग्र चेहऱ्यावरील आंकडेबाज मिशांच्या आड मिस्किल हास्य सदैव लपलेलें असतें व प्रसंग विशेषीं तें खळखळून बाहेर येतें. त्यांच्या भेदक व करड्या नजरेंत, दयेची, कारुण्याची सूक्ष्म छटा सदैव लपलेली असते, ती दया व तें कारुण्य ज्यांना लाभलें ते धन्य होत.

सिल्मना समजूं उमजूं लागण्यापूर्वींच त्यांचे वडील लक्ष्मणराव व मातुःश्री नागम्मा हें जग सोडून गेलीं. त्याचें लालनपालन त्यांचे सख्ले चुलते सयदू व चुलती यल्लूबाई या दोघांनीं केलें. त्यांचे दुसरे चुलते रामय्या यांना मुलगा होता, परंतु सयदू-यल्लूबाई यांना अपत्य नव्हतें. त्यांनीं लहान सयाजीचा सांभाळ स्वतःच्या पोटच्या मुलाप्रमाणें केला. त्यांनीं सिल्म यांचें सर्व शिक्षण व लग्नकार्य केलें, या गोष्टीचा ते कृतज्ञतापूर्वक उल्लेख करतात.

सिलम यांचें लग्न त्यांच्या चुलत्यांनीं ते बारा वर्षांचे असतांना म्हणजे १९०८ सालीं लावून दिलें. ज्या मुलीच्या घरीं ते १९०५ सालीं एका बारशाच्या निमित्तानें गेले, ती मुलगी तीन वर्षांनीं त्यांची "लक्ष्मी" म्हणून त्यांच्या घरीं आली. त्या गोष्टीला आज ५८ वर्षे होऊन गेलीं आहेत. गेल्या ५८ वर्षांत या दांपत्यावर सुखदुःखाचे अनेक प्रसंग आले. आपण राजकारणांत व समाजकारणांत दंग असतांना, राजकारणापायीं तुरुंगवास पडला असतां, आपला संसार पत्नीनें व्यवस्थित सांभाळला, तिनें स्वतःचा धीर खचूं दिला नाहीं, आयुष्यात अनेक आपत्तींना तोंड द्यावें लागलें तरी ती डगमगली नाहीं, या गोष्टीचा सिलम जेव्हां भावपूर्ण शब्दांत उल्लेख करतात, तेव्हां त्यांच्या अंतःकरणाची ओळख पटते. पत्नीच्या बाबतींत त्यांच्या भावना किती हळुवार आहेत याची जाणीव तेव्हां होते.

अक्का म्हणजे सिलमच्या पत्नी तशा पाहिल्या तर किरकोळ शरीरयष्टीच्या, नाजुक बांध्याच्या. अठ्ठावन्न वर्षांच्या कौटुंबिक जीवनांत त्यांनीं अनेक आघात कसे सहन केले असतील याचें आश्चर्य वाटतें. त्या तशा मनमिळावू स्वभावाच्या आहेत, आपण विधान सभेच्या अध्यक्षाच्या पत्नी आहोंत, नायब राज्यपालाची बायको आहोंत, याचा त्यांना गर्व नाहीं. लहान मोठ्या सर्व माणसांशीं त्या प्रेमळपणानें वागतात, ओळखीच्या माणसाची आस्थापूर्वक चौकशी करतात, त्यांना शक्य असेल तें सहाय्य करतात, त्यांना पैंक्तिप्रपंच ठाऊकच नाहीं. त्या सदैव आपल्या संसारांत दंग असतात. मुलाबाळांच्या संसाराकडे त्यांचें बारीक लक्ष असतें आणि या वयांत देखील त्यांना स्वयंपाकपाण्याची भारी हौस. त्या आदर्श पत्नी तर आहेतच, तशा आदर्श माता, आदर्श आजी आणि आदर्श पणजीदेखील आहेत. आपलीं मुलें, नातवंडे, पणतवंडें, दैरी, मुना यांची काळजी त्या नेहमीं वहातात. त्या सर्वांच्या आवडी निवडींत जातीनें लक्ष घालतात. आपलीं नातवंडे पणतवंडे, नातसूना यांच्या समवेत एकत्र बसून भोजन करतांना त्यांचें अंतःकरण कसें भरून येतें, त्यांच्या चेहेऱ्यावर समाधान कसें विलसतें, तें मी प्रत्यक्ष पाहिलें आहे. त्या प्रत्येकाची आवडनिवड ओळखून त्या प्रत्येकाची हौस पुरवतात, तो जिन्नस मिळेल तेथून आणून देतात. अशा वेळीं त्या व्यक्तीनें तो मनापासून खाल्ला नाहीं, तर त्या लगेच नाजुक तक्रार करतात कीं, आपण एवढ्या मुष्किलीनें हा जिन्नस मिळविला, तर या मुलींना तो लाभलाच नाहीं! त्यांच्या या राज्यांत सिलमांचें काहीं चालत नाहीं आणि तसा आग्रहीपणाहि सिलम दाखवीत नाहींत. त्यांनीं कोणाला पाठीशीं घातलें अथवा अभय दिलें तर सिलम तक्रार करण्यापलीकडे कांहीं करीत असतील असें मला वाटत नाहीं. कुटुंबप्रमुख म्हणून तिचाच अधिकार विशेष आहे, ही भूमिका त्यांना पटली असावी असें वाटतें.

अक्का कमालीच्या धार्मिक आहेत. देवदर्शन, संतदर्शन त्यांचें नित्य नाईंच असतें. योगी अरविंदांच्या समाधीचें दर्शन घेतल्याशिवाय त्यांचा एकहि दिवस जात नसेल असें मला वाटतें. परोपकारी व निगर्वी तर इतक्या कीं, ओळखीच्या सर्व माणसांची

जातीनें चौकशी करतील. पाँदिचेरीमध्ये तर त्यांनी इतका गोतावळा जमविला आहे कीं, त्यांची गाडी वाटेंत थांबत थांबत जाते व त्या ओळखीच्या बाईंची विचारपूस केल्याशिवाय पुढें जात नाहींत.

खाजगी जीवनांत सिल्म यापेक्षां कांहीं फारसे वेगळे नाहींत. राजकीय क्षेत्रांतील मित्रापेक्षा सामाजिक क्षेत्रांतील मित्रांना ते जास्त जवळचे अतएव जिव्हाळ्याचे वाटत असावेत. हे त्यांचे मित्र पूर्वाश्रमीचे म्हणजे राजकारणांत ते मोठ्या अधिकारावर चढण्यापूर्वीचे आहेत. ते समाजाच्या निरनिराळ्या थरांतील आहेत. त्यांच्या गप्पागोष्टींत रंगतांना हास्यविनोद करतांना मी त्यांना पाहिलें आहे. त्यांच्याबरोबर भोजन करतांना पाहिलें आहे. अशा वेळीं सिल्म आपला दर्जा विसरून जाऊन त्यांच्यांतील एक बनतात. मला वाटतें खऱ्या सिल्मांचें दर्शन अशा मेळाव्यात, अशा बैठकींतच घडतें. परंतु सिल्मांच्या जीवनाचा हा पैलू पहाण्याचें भाग्य थोड्यांना लाभतें.

सिल्म वृत्तीनें इतके धार्मिक आहेत कीं, कोणत्याहि धार्मिक सोहाळ्यांत ते लीलया समरस होतात. आळंदीच्या यात्रेला ते हमखास जातातच. मावळ प्रांतांत चाँदखेड येथे धनगर समाजांतील रामजीबाबा नांवाच्या संताची समाधि आहे. त्या संताच्या पुण्यतिथीचा उत्सव त्या समाजांतील लोक दर वर्षी करीत असतात. त्या उत्सवाला दर वर्षी जाणें हा त्यांचा नेम बनला होता. पाँदिचेरीला लेफ्टनण्ट गव्हर्नर म्हणजे नायब राज्यपाल म्हणून जाईपर्यंत त्यांच्या या नेमधर्मांत कधीं खंड पडला नाहीं. तसेंच दर वर्षी गणेशोत्सवामध्ये कांहीं मित्रांच्या घरीं त्यांची भेट ठरलेली. अशा वेळीं त्यांची शिस्त, स्वभावातील करडेपणा वगैरे गोष्टी अगमर बाजूला रहातात. सिल्म बहुजनसमाजांत लोकप्रिय झाले आहेत त्याचें हें कारण आहे.

एका मोठ्या व वाढत्या कुटुंबाचा प्रमुख या नात्यानें सिल्म यांनी आपली जबाबदारी पार पाडली आहे. मुलगा, चार मुली, पुतणे व इतर जवळचे आप्त यांच्या बाबतींतील कर्तव्य आपण पार पाडलें याचें समाधान त्यांना आज उचितच लाभलें आहे. आपल्या हातांतील अधिकाराचा उपयोग, आपल्या मुलामुलींना तसेंच अन्य आप्तांना अधिकाराच्या जागांवर नेऊन बसविण्यासाठीं त्यांनी आजपर्यंत कधीं केला नाहीं. इतरांना मात्र ते उपयोगी पडले आहेत व नेहमींच पडतात. परंतु स्वतःच्या मुलांसाठीं आपण कोणाकडे शब्द टाकला नाहीं असें ते सांगतात. त्यांचे चिरंजीव दत्तोपंत हे आज एका मोठ्या कंपनीत अधिकाराच्या जागेवर आहेत. हें स्थान त्यांनी स्वतःच्या हुशारीनें व कर्तृत्वानें मिळविलें आहे. त्यांचें आज ठीक चाललें आहे, यांतच सिल्म यांना समाधान वाटतें व याचा ते अभिमानानें उल्लेख करतात. त्यांची कन्या विठाबाई या डॉ. बाळकृष्ण रामचंद्र नायन यांच्यासारख्या ख्यातनाम शल्यकर्मतज्ज्ञाच्या पत्नी आहेत. त्यांचाहि संसार उत्तम चालला आहे. त्यांच्या बाजूनें ते आजोबा व पणजोबा देखील झाले आहेत. डॉ. नायन आज

सिलम यांचे कामात असले तरी ते त्यांच्या विद्यार्थीदशेपासून त्यांचे चहाते व अभिमानी आहेत. त्यांचे खाजगी चिटणीस म्हणून त्यांचे दप्तर त्यांनी सांभाळलें आहे. ज्यां सिलम यांचें विस्तृत चरित्र कोणी लिहिण्याचें ठरविलें, तर त्याला लागणारी साधनसामुग्री त्यांच्याजवळ सापडेल. त्यांची दुसरी कन्या कै. शांता. तिचे पति श्री. का. ज. धनशेट्टी एक कलाकार आहेत. त्यांची तिसरी मुलगी कुमारी रतन या पदवीधर असून मुंबईच्या सेवासदन ट्रेनिंग कॉलेज-मध्यें प्राध्यापिका आहेत. आज सिलमाचें वास्तव्य पाँदिचरीमध्यें असले तरी मुंबईच्या बिऱ्हाडाची जबाबदारी त्यांनी आपल्या मुलांवर टाकलेली नाहीं. त्याच्या खर्चाची तरतूद ते पाँदिचरीहून करतात. तसे ते व्यवहाराला अत्यंत चोख असे गृहस्थ आहेत व स्वतःच्या कर्तव्यांत चूक होऊं नये व कोणाला टीका करण्यास संधी मिळूं नये म्हणून ते फार जपत असतात. चौथी कन्या सौ. शकुंतला अहमदनगरला असतात. त्यांचे पति श्री. मधुकर जकात उत्तम कार्यकर्ते आहेत.

सिलम तसे सरळमार्गी, व्यवहाराला चोख व स्पष्टवक्ते आहेत. आडमार्गानें जाऊन कांहीं कारवाया करणें त्यांना आवडत नाहीं, न त्यांच्या स्वभावांत नाहीं तसेंच ते राजकारणांत असले तरी सत्तास्पर्धेचें, स्वतःचें आसन टिकवून धरण्याचें हिडीस व स्वार्थाचें राजकारण कधीं खेळले नाहींत. १९६२ सालच्या निवडणुकींत त्याना तिकिट मिळालें नाहीं, त्याबद्दल त्यांनीं कधीं तक्रार केली नाहीं, तसेंच कोणाजवळ वशिलाहि लावला नाहीं. कै. पु. रा. लेले यांच्या-सारखे मित्र त्याना अनेक बाबतींत सल्लामसलत देत असत. त्यांच्या मार्गदर्शनाचा लाभ स्वतः सिलम घेत असत. लेल्यांनीं या निवडणुकीच्या वेळीं त्यांना वेळींच सावधगिरीचा इशारा दिला होता. परंतु स्वतःसाठीं खटपट करणें, हें त्याच्या स्वभावांत नसल्या कारणानें ते, ' तुका म्हणे उगी रहावें, जें जें होईल तें तें पहावें ' अशा स्थितप्रज्ञाच्या उदासीनतेनें वागले.

पुढें १९६२ ते १९६३ च्या वर्षांत त्यांना अशा दोन मोठ्या संध्या चालून आल्या कीं, ज्यामध्यें त्यांना फार मोठा आर्थिक लाभ होण्याची शक्यता होती. तीं दोन्हीं पदें अखिल भारतीय अधिकाराचीं व मोठ्या प्रतिष्ठेचीं होतीं. परंतु सत्ता व संपत्ति मिळविणें हें सिलम यांचें ध्येय नव्हतें. आपल्या हातून जास्तीत जास्त जनसेवा घडावी, अनेकांचें कल्याण साधावें, हें त्यांचें ब्रीद असल्या कारणानें त्यांनी त्या दोन्ही अधिकाराच्या जागा नम्रतापूर्वक नाकारल्या.

लोकसेवा व लोकसंग्रह यासाठीं सिलम आयुष्यभर झटत आले आहेत. सार्वजनिक जीवनांतील जनतासेवकांचें असें एकहि क्षेत्र नाहीं कीं, जेथे सिलम यांचा संबंध आलेला नाहीं. या क्षेत्रातील अनेक लोकांना त्यांनीं शक्य तें सहाय्य केलें आहे. त्यांच्या ऋजू स्वभावाचा गैरफायदा घेणारी माणसें त्यांना भेटलीं नाहींत अथवा भेटत नाहीत असें नाहीं. परंतु तें त्यांना पुष्कळदा फार उशीरा समजतें. तथापि जात्याच त्यांचें अंतःकरण विशाल व स्वभाव उदार असल्या कारणानें व परोपकाराकडे सदैव प्रवृत्ति असल्यामुळें, ते आपला धर्म-कधीं सोडत नाहीत.

अशा रीतीनें इतरांच्या उपयोगी पडणारे सिल्म, पाँदिचरीसारख्या छोट्या राज्याचे लेफ्टनण्ट गव्हर्नर सिल्म, स्वतःच्या सुखी संसारांत दंग असलेले सिल्म, गोरगरिबांचा दुवा मिळविणारे सिल्म आज खरोखरीच्या घरांत खरोखरच पूर्ण सुखी आहेत का, हा प्रश्न शेवटीं उरतोच. परंतु त्याचं उत्तर मी देत नाहीं!

## : ८ :

## पाँदिचरीचे लेफ्टनण्ट गव्हर्नर

आज सिल्म पाँदिचरी या चार ठिकाणीं विभागलेल्या भूतपूर्व फ्रेंच वसाहतीचे लेफ्टनण्ट गव्हर्नर आहेत. १९६३ सालच्या ऑक्टोबरमध्यें पाँदिचरी युनियन टेरिटरी झाल्यानंतर सिल्म तिचे पहिले लेफ्टनण्ट गव्हर्नर झाले. ही युनियन टेरिटरी म्हणजे केंद्र-शासित राज्य असल्याकारणानें लोकनियुक्त मंत्र्यांपेक्षां लेफ्टनण्ट गव्हर्नरांचे अधिकार जास्त व्यापक आहेत. राज्यकारभारामध्यें ते पक्के मुरलेले असल्या कारणानें, त्यांना आपल्या या चार ठिकाणीं पसरलेल्या राज्याचा कोनाकोपरा ठाऊक आहे. स्थानिक राजकीय पक्ष व त्यांचे हितसंबंध आणि त्यांचे डावपेंच याची त्यांना अद्यावत माहिती आहे. त्यामुळें त्यांना कोणी बनवूं पाहील अथवा त्यांची दिशाभूल करूं शकेल हें सुतराम् शक्य नाहीं. ते सर्वसत्ताधीश असले तरी लोकशाही मूल्यांना जपणारे आहेत. आपल्या मंत्र्यांच्या अधिकारक्षेत्रांत ते अधिक्षेप करीत नाहींत, त्याचबरोबर त्यांना मनमानेल तसें वागण्यास संधी देत नाहींत. राज्यकारभारावरील त्यांची पकड घट्ट आहे, त्यामुळें कोठे गोंधळ माजेल, अराजक निर्माण होईल ही गोष्टच मुळीं शक्य नाहीं.

१९६६ सालच्या फेब्रुवारीमध्यें मी पाँदिचरीला गेलों तेव्हां सिल्म मला एका काळजीनें व्यग्र झालेले दिसले. पाँदिचरीमधील तीन गिरण्यांपैकीं एका गिरणींत संप झाला होता. मालकानें टाळेबंदी केली होती. पंधराशें मजूर बेकार झाले होते. संपवाल्यांनीं त्यांच्या बंगल्यावर मोर्चा नेला तो मी पाहिला. हे मजूर कमालीचे शांत दिसले. आकस्ताळेपणाच्या घोषणा नव्हत्या, हुल्लड नव्हती. त्यांची मागणी एकचीच होती, आम्हांला काम द्या, आमची इतक्या वर्षांची सर्व्हिस द्या.

सिल्मनीं मालक व मजूर या दोघांचेंहि म्हणणें शांत चित्तानें ऐकून घेतलें. मालकांनीं सांगितलें कीं, गिरणी तोट्यांत असून ती चालविण्यास व कामगारांच्या मागण्या पुर्‍या करण्यास आपण असमर्थ आहोत. त्यांनीं एकंदर परिस्थितीची पहाणी करून केंद्राकडे शिफारस केली कीं, ही गिरणी सरकारनें चालविण्यास घ्यावी. केंद्राकडे दोनदां निवेदन सादर करून देखील उत्तर न आल्यामुळें सिल्म किंचित् अस्वस्थ झाले होते. मजूरवर्ग बेकार व्हावा ही गोष्ट त्यांच्या स्वभाववर्मास मानवणारी नव्हती.

दुसरी गोष्ट मी अशी पाहिली की, तेथील योगी अरविंदाश्रम ही पॉंदिचरीच्या भारतीय अधिराज्यांतील स्वायत्त अशी संस्था आहे. या संस्थेनें अर्धी अधिक पॉंदिचरी व्यापली आहे. या संस्थेचे व स्थानिक जनतेचे संबंध चांगले नाहींत, शासनाशींहि तिचे संबंध समाधानकारक नाहींत. सिलम यांनीं आश्रम व शासन यांच्यांत सामंजस्य निर्माण करण्याचा प्रयत्न चालविला आहे. शासनाला डावलून, स्थानिक जनतेला झिडकारून आश्रम चालविणें कठीण होईल, त्यानें काळाचीं पावलें ओळखून वागलें पाहिजे ही गोष्ट ते आश्रमाच्या चालकांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न सतत करीत असतात. १९६५ सालीं लोकक्षोभाचा उद्रेक होऊन त्याची झळ आश्रमाला लागली. त्या वेळीं सिलम होते म्हणूनच आश्रम शाबूद राहिला. त्यांच्या निवासस्थानाच्या पिछाडीलाच आश्रमाचा वेलविस्तार झालेला आहे.

सिलम यांची आणखी एक डोकेंदुखी म्हणजे दारूबंदी. सिलम महाराष्ट्राच्या नशाबंदी मंडळाचे अध्यक्ष. दारूबंदी हें त्यांचें आवडतें कार्य आहे. परंतु आज पॉंदिचरीमध्यें दारू मिळते. त्यांच्या निवासस्थानाच्या परिसरांतच दारू गाळण्याचा कारखाना आहे आणि समोर शहरांतील एक मोठा बार आहे. मद्रास राज्यांत दारूबंदी असल्याकारणानें त्या राज्याच्या सीमेवरील लोक दारू पिण्यासाठीं पॉंदिचरीला येतात. सिलम यांनीं या गोष्टीला आळा घालण्याचा प्रयत्न केला. तो म्हणजे हळुहळू दारूचे परवाने कमी करणें. त्यांचा हा प्रयोग चालू आहे आणि १९६९ पर्यंत म्हणजे गांधीजींच्या जन्मशताब्दीच्या पूर्वी पॉंदिचरीमध्यें बहुतेक दारुबंदी यशस्वी होईल, असा विश्वास बाळगायला हरकत नाहीं.

मी असें ऐकलें होतें कीं, सिलम पूर्वी पॉंदिचरीच्या विस्तीर्ण समुद्र किनाऱ्यावर रोज सकाळीं सहलीसाठीं जात असत. समुद्र त्यांच्या निवासस्थानाजवळ आहे. या समुद्र किनाऱ्यावर लोकांची तुरळक कां होईना वर्दळ असते. आपला राज्यपाल असा उघड्यावर फिरतो व सामान्य जनता त्याच्याकडे जाऊन बोलूं शकते, तो सर्वांची आस्थापूर्वक चौकशी करतो, याचें लोकांना सहाजिकच आश्चर्य वाटतें. फ्रेंच सरकारचा प्रमुख प्रतिनिधि समुद्र किनाऱ्यावरच रहातो. परंतु त्याचें असें दर्शन कधींच कोणाला घडत नाहीं. लोकांना हा फरक जाणवल्याशिवाय कसा राहील ? म्हणूनच ' जनतेचा राज्यपाल ' हें विशेषण सिलमना यथार्थतेनें लागूं पडतें.

आज मुंबईसारख्या दूरच्या ठिकाणीं सिलम यांचा असा लौकिक पसरला आहे कीं, मुंबईहून कोणीहि माणूस पॉंदिचरीला गेला तर सिलम यांच्याकडून त्याची अगत्यपूर्वक चौकशी होते व त्याला शक्य ती मदत ते करतात. सिलम यांचा आतिथ्यशील स्वभाव ज्यांना ठाऊक आहे, त्यांना यांत आश्चर्य वाटणार नाहीं. पॉंदिचरीमध्यें दोन हातांच्या बोटांवर मोजतां येण्याइतकीं देखील मराठी माणसें नाहींत. त्या सर्वांची सिलम यांच्याशीं ओळख आहे असें दिसतें. या मंडळींना सिलम यांच्या बंगल्यावर जाण्यास

# श्री. सयाजीरावांच्या जीवनांतील संस्मरणीय घटना

लेखक : डॉ. वि. रा. भूसरथ M. B. B. S., M. R. SAN. I., J. P.

आपल्या गुणसंपत्तीनें ऐश्वर्याच्या शिखरावर पोहोंचलेल्या श्रीकृष्णाचें चरित्र त्याचा गुरुबंधु सुदामा याला जर लिहावयास सांगितलें असतें तर त्याला जसा आनंद झाला असता तसाच आनंद आज श्री. सयाजीराव सिलम यांचें विविध दर्शन घडवून आणण्यांत मला होत आहे. मी त्यांचा बालपणींचा सवंगडी असल्यामुळें आजहि आम्हीं एकमेकांना एकेरी नावानें संबोधितों. लहानपणींच्या सयाजीविषयींच्या गोष्टी सांगण्यांत मला खरोखरच आनंद वाटतो. तो कां वाटतो ? जो माझ्या गरीब मोहल्ल्यांत जन्मला, लहानपणीं एकाच शाळेंत, एकाच वर्गांत, एकाच बाकावर बसून माझ्याबरोबर शिकला, वाढला व खेळला, कुमारावस्थेंत व तारुण्यांत माझ्याबरोबर अनेक सामाजिक व शैक्षणिक क्षेत्रांत ज्यानें कार्य केलें तो स्वातंत्र्योत्तर काळांत ईश्वराच्या कृपेनें विधानसभेचा सभापति झाल्यामुळें मला, माझ्या शाळेला, माझ्या कामाठीपुरा मोहल्ल्याला व समाजाला त्याच्याविषयीं अभिमान वाटतो म्हणून !

सयाजीचा जन्म ता. १८ मे १८९६ रोजीं कामाठीपुरा दुसऱ्या गल्लींत झाला. बाल सयाजीच्या लहानपणींच त्याचीं मातापितरें निवर्तलीं. तेव्हांपासून त्याच्या चुलत्यांनीं त्याला हाच आपला मुलगा आहे असें समजून त्याचें चांगल्या रीतीनें संगोपन केलें. चुलत्यांची प्रापंचिक स्थिति मध्यम प्रकारची होती. कामाठीपुरा तेराव्या गल्लीच्या नाक्यावरील सरकारी शाळेंत मराठी दुसरी इयत्ता पूर्ण झाल्यावर सयाजीच्या चुलत्यांनीं इ. स. १९०४ मध्यें कै. भार्गव विनायक जोशी यांच्या शाळेंत त्याचें नांव इयत्ता तिसरींत दाखल केलें त्यावेळीं मीसुद्धां त्याच वर्गांत होतों. कधीं त्याचा नंबर माझ्यावर तर कधीं माझा नंबर त्याच्यावर. आम्हीं दोघे एकाच बाकावर बसत असूं.

इ. स. १९०५ मध्यें कुमार सयाजीच्या कामाठीपुरा दुसऱ्या गल्लींत माझ्या मामीच्या नात्यांतील "लोका" या नांवाच्या मुलीकडे नामकरण विधी होता. त्या समारंभास माझ्या आईबरोबर मीहि गेलों होतों. तेथील एका वृद्ध बाईनें मला विचारलें, 'अरे, काय शिकतोस ?' 'इंग्रजी,' मी म्हणालों. 'मग तुला इंग्रजी बोलतां येत असेल ?' 'होय !' मी ठासून सांगितलें. इतक्यांत सयाजी आपल्या चुलतीबरोबर त्या समारंभास आला. मी त्याला एकीकडे नेऊन सांगितलें, "सयाजी, येथील बायांना आपण चकित करून सोडूंया. मी आपल्या रॉयल रीडरमधला तोंडपाठ झालेला पहिला धडा म्हटल्यावर तूं दुसरा धडा म्हणून दाखव. म्हणतांना जणूं आपण इंग्रजीतून संभाषण करीत आहोंत

असें वर्णन करून दिसून आलें पाहिजे." नंतर हें नाटक आम्ही दोघांनीं करून तेथें जमलेल्या पुरुष स्त्रियांची खात्री करून दिली कीं, आम्हीं एवढ्या लहान वयांतहि खूप विद्वान झालों आहोत.

ज्या मुलीच्या घरीं तो समारंभ होता, तिचें लग्न, सयाजीबरोबर तीन एक वर्षांनीं म्हणजे इ. स. १९०८ मध्यें मोठ्या थाटानें होऊन ती मुलगी लक्ष्मीबाई सिलम झाली. ती मुलगी सिलमच्या घराण्यांत पडल्यापासून त्यांच्या घराण्याचा उत्कर्ष होत गेला. तिचाच तो पायगुण म्हटला पाहिजे.

मी वरील प्राथमिक शाळेंत असतांना तिसऱ्या गल्लींतील शेट राजू बाबाजीच्या रात्रींच्या शाळेंतहि जात असे. तेथील शिक्षक दिवसा शाळेंत न समजलेले धडे आम्हांस रात्रीं समजावून सांगत. दर शनिवारीं मुलांच्या अंगीं सभाधीटपणा येण्याकरितां काय करावें व लहान लहान विषयांवर चारचौघांपुढें कसें बोलावें हें पण ते शिकवीत, शिवाय चांगल्या चांगल्या पुस्तकांतील सार आम्हास समजेल अशा सोप्या भाषेंत सांगत. तेथें जें कांहीं नवीन मी शिकलों, तें मी सयाजीला दुपारच्या सुटींत सांगें. शिकल्याशिवाय मान व धन मिळायचें नाहीं हें आमच्या गुरुजींनीं आमच्या मनावर चांगलेंच बिंबविलें होतें. लहानपणीं सयाजी दिसण्यांत देखणा, हुशार, तरतरीत व मनमिळाऊ होता. तो जरी इ. स. १९०६ नंतर विल्सन हायस्कूलमध्यें व मी आर्यन एज्युकेशन सोसायटी हायस्कूलमध्यें गेलो तरी आमची मैत्री कायम राहिली.

इ. स. १९०८ मध्यें इंग्रजी तिसऱ्या इयत्तेंत असतांना २५–३० मुलांच्या सहकार्यानें आम्हीं "तेलगू बाल ज्ञानोत्तेजक समाज" या नांवाची संस्था स्थापिली. दर रविवारीं दुपारीं कुणातरी सभासदाच्या घरीं आम्हीं खाजगी बैठक भरवून निरनिराळ्या सामाजिक विषयावर वादविवाद करीत असूं. त्या संस्थेच्या विद्यमानें तेलगू हॉलमध्यें विद्वान मंडळींचीं व्याख्यानें, निबंधस्पर्धा, वक्तृत्वस्पर्धा, श्री. मरि आम्मा देवालयाच्या आवारांत शारीरिक खेळ व सामने घडवून आणीत असूं. मुंबईंत कोठेंहि, कुणाचें व्याख्यान असल्यास आम्हीं दोघे तेथें जात असूं. हळुंहळूं पुढाऱ्यांच्या सुधारकी विचाराचा व आचरणाचा परिणाम आमच्या मनावर होऊं लागला. कु. सयाजीची इंग्रजी शाळा खिश्चन मिशनरी लोकांची होती. पण माझी आर्यन शाळा सरकारी मदत न घेणारी व राष्ट्रीय वृत्तीच्या स्वार्थत्यागी तरुण मंडळींनीं काढलेली होती. माझ्या शाळेंत बहुसंख्य गरीब ब्राह्मणांचीं मुलें होतीं. जरी माझे अनेक ब्राह्मण मित्र होते, तरी माझा जानी दोस्त सयाजीच होता. मॅट्रिक पास झाल्यानंतर सयाजी विल्सन कॉलेजांत व मी सेंट झेवियर कॉलेजांत जाऊं लागलों. सयाजी कॉलेजात असतांना एका फारसी कवीनें लिहिलेल्या अध्यात्मिक कवितांचा त्यानें मराठींत अनुवाद केल्यावर तो पुस्तकरूपानें आमच्या संस्थेच्या मदतीकरितां आम्हीं प्रसिद्ध केला. अनेकांना सयाजीची वाङ्मय-

ति आवडली. मला विद्यार्थीदशेंत मदत करणारे एन्. पॉवेल कंपनीचे मालक कै. डॉ. आनंदराव नायर तें पुस्तक मोठ्या आवडीनें वाचीत असत.

राष्ट्रीय सभेला स्वराज्याची कल्पना पहिल्यांदा देणारे दादाभाई नौरोजी यांच्या संबंधानें आम्हांस विशेष आदर. संस्थेचे चिटणीस या नात्यानें त्यांच्या वाढदिवसानिमित्त एक अभिनंदनपर पत्र त्यांना पाठविल्यावर त्यांनीं आमच्या संस्थेला वेसावा-अंधेरी येथून मोठ्या प्रेमानें आशीर्वाद पाठवून आम्हीं करीत असलेल्या कार्याबद्दल समाधान व्यक्त केलें. तें पत्र कुमार सयाजीनें कित्येक वर्षे जपून ठेविलें होतें. राष्ट्रभक्तांच्या एकदोन शब्दांमुळें तरुण कार्यकर्त्यांचा उत्साह वाढतो ही गोष्ट खरी.

आमच्या मोहल्ल्यांत राहाणारे कै. शंकरराव परशा कामाठीपुऱ्यांतील एक माननीय गृहस्थ होते. त्यांचें गांभीर्य, स्वभावाचा उदारपणा, तेलगू समाजाविषयीं कळकळ, लो. टिळकांविषयीं ज्वलन्त अभिमान, प्रतिपक्षाकडून आपल्या समाजांत इष्ट तें काम करवून घेण्याची हातोटी वगैरे, त्यांच्या अप्रतीम गुणांचा पगडा आमच्या मनावर बसला. श्री. सयाजी व इतर तरुणांना सार्वजनिक कार्ये निरलस वृत्तीनें करण्याची स्फूर्ति त्यांच्यापासून मिळाली. महाराष्ट्रांतील तेलगू लोकांना संघटित करून तेलगू एज्युकेशन फंड, लिंगूबाई व. फंड, तेलगू फ्री लायब्ररीचा विकास, वगैरे अनेक समाजोपयोगी कार्ये त्यांनीं केलेलीं होतीं. इ. स. १९१५-१६ मध्यें त्यांच्याच नेतृत्वाखालीं रावसाहेब कै. पोरेड्डी यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या तेलगू संमेलनांत श्री. सयाजी सिलम व मी मोठ्या ईर्षेनें भाग घेऊन तें यशस्वी केलें. कै. शंकरराव परशा यांनीं समाजहिताकरितां "तेलगू समाचार" या नांवाचें मासिक मराठींत काढलें. आमच्या लोकांची घरांतील भाषा तेलगू व घराबाहेरील व अभ्यासाची भाषा मराठी आहे. कांहीं महिन्यांनीं त्यांचें धोरण पुरोगामी नसल्यामुळें आम्हांस तें पसंत पडलें नाहीं.

श्री. सयाजी सिलम यांनीं कॉलेजमध्यें असतांना माझें सहकार्य घेऊन तेलगू समाजामध्यें सामाजिक, शैक्षणिक व राजकीय जागृति करण्याच्या उद्देशानें "तेलगू मित्र" या नांवाचें मासिक सुरू केलें. लेखनाचा दर्जा उंच ठेवतां यावा, भाषाशैली अवगत व्हावी म्हणून कॉलेजचा अभ्यास सांभाळून केसरीचे मागील अंक, आगरकरांचे, चिपळूणकरांचे निबंध व लेख, गिरजाबाई केळकर वगैरे विद्वान मंडळींनीं लिहिलेले ग्रंथ आम्हांस वाचावे लागत. त्यापैकीं कांहीं नुसते वाचतच नव्हतों तर कांहीं पुस्तकांचा व्यासंग केला होता. कांहीं दिवसांनीं लिखाणांत सफाई व सुटसुटीतपणा येऊं लागला. आमचें मासिक लोकप्रिय करण्याकरितां सामान्य जनांच्या भाषेंत आम्ही लिहूं लागलों. त्यावेळींहि श्री. सिलम यांचे मोडी, बालबोध व इंग्रजी अक्षर सुंदर होतें. मासिकामुळें आम्हां दोघांचा दरारा इतका वाढला कीं, आम्हीं आमच्या मासिकांत केलेल्या कठोर पण योग्य टीकेची दखल आमच्या समाजांतील पुढारी मंडळी घेऊं लागली. या मासिकाद्वारें सुमारे ४-५ वर्षे

श्री. सयाजी सिलम यांनीं समाजांत चैतन्य निर्माण करून त्याची फार मोठी सेवा केलेली आहे.

इ. स. १९१८ मध्यें फार मोठ्या प्रमाणावर एन्फ्ल्युएन्झाची सांथ मुंबईंत सुरू झाली. त्यावेळीं मुंबईंत एकाच वेळीं इतके लोक आजारी पडले कीं मुंबईंतले सारे डॉक्टर्स अपुरे पडूं लागले. परिचारिका (नर्सेस) व वैद्कीय कॉलेजमधल्या विद्यार्थ्यांनासुद्धां भरपूर काम मिळालें. गिरगांवांतील जैन फीव्हर हॉस्पिटलांत रात्रपाळीकरितां रोज रु. १५ प्रमाणें मलाहि नोकरी मिळाली. कामाठीपुऱ्यांत सयाजीनें ते बा. शा. संस्थेतील ४०–५० सभासदांना हाताशीं धरून डॉ. कै. ढवळे व कै. विठोबा पुप्पाला यांच्या नेतृत्वाखालीं एक औषधोपचाराचें केन्द्र उघडलें. त्या केन्द्रांत माझा उपयोग होईल हें हेरून मला तेथें काम करण्याची विनंती करण्यांत आली. मी माझें काम सांभाळून दररोज दोन तास केन्द्रांत काम करूं लागलो. त्या केन्द्रांत हजारों गरीब लोकांना मोफत औषधें मिळालीं. ज्यांना केन्द्रावर येतां येत नसे, त्यांच्याकडे स्वयंसेवक जाऊन औषधें पुरवीत असत. या सांथींत आमचे एक जिवलग स्नेही व सयाजीचे मेहुणे श्री. धर्माजी कुडताल दगावले. श्री. सयाजी आदिकरून सर्व मित्र मंडळींना दुःख झालें. तें सारें दुःख गिळून सयाजीनें कामाठीपुऱ्यांतील गरीब जनतेची सेवा मनोभावें व निर्लोभीपणें करून त्यांचीं अंतःकरणें जिंकलीं.

इ. स. १९२० मध्यें श्री. सयाजीराव सिलम एल्. एल्. बी. होऊन वकील झाले. व मी एम्. बी. बी. एस्. होऊन डॉक्टर झालों. लो. टिळक वारल्यानंतर गांधीयुगाला सुरवात झाली. म. गांधींचा कार्यक्रम आचरणांत आला तर एका वर्षांत स्वराज्य नक्की मिळेल असें महात्माजींनीं व त्यांच्या अनुयायांनीं अनेक भाषणांत प्रतिपादिलें होतें. तेव्हां तरुणांच्या उत्साहाला पारावार नव्हता. श्री सिलम व कै. शंकरराव पुप्पाला यांनीं असहकारितेच्या पेन चळवळींत कामाठीपुऱ्यातील जनतेचें लक्ष देशहिताकडे वळविलें. पुढें कोर्टावर बहिष्कार टाकल्यामुळें श्री. सिलम यांना वकिली सोडावी लागली.

नंतर "ई" वार्डांतून म्युनिसिपल निवडणुकींत बॅ. वॅप्टिस्ट व आमचे एक समाजपुढारी श्रीमंत शंकरराव गांगला उभे राहिले. त्यांना आमच्या समाजांतील कांहीं भांडवलदार पुढाऱ्यांचा पाठिंबा होता. आमच्या मागांतील तरुणांनीं श्री. सिलम यांना उभें केलें. आम्हीं मतदारांकडे जातीनें हिंडून सर्व प्रचारकार्य श्री. सिलम यांच्याकरितां केलें. श्री. सिलम यानीं अनेक वेळां निःस्वार्थ बुद्धीनें केलेली सेवा ध्यानीं आणून "ई" वार्डांतल्या मतदारांनीं श्री. सिलम यानां विजयी केलें. त्यावेळीं भांडवलदार पुढाऱ्यांचा पराभव केल्याबद्दल फॉकलंड रोड येथील कै. नागू सयाजी बंगल्यांत त्यांच्या अभिनंदनार्थ मी मोठा समारंभ भरविला. त्यांच्या विजयामुळें व गोड भाषणामुळें सार्वजनिक कार्यांतला आमचा उत्साह दुणावला. मुंबई नगरपालिकेशीं त्यांचा अनेक वर्षें संबंध

होता. परंतु या कारणास्तव त्यांनीं कोणतेंहि वैयक्तिक फायद्याचें काम स्वतःसाठीं करून घेतलें नाहीं, ही गोष्ट त्यांना अत्यंत भूषणावह आहे.

## मुंबईंत हैद्राबाद प्रजा परिषद :

दक्षिण हैद्राबादेंतील हिंदू लोक सहावें वर्षांहून अधीक काळ निजामाच्या गुलामगिरींत खितपत पडलेले होते. सामाजिक व धार्मिक बाबतींत अनेक वेळां त्यांचा छळ मुसलमान अधिकाऱ्यांकडून होत असे. राजकीय जागृति करूं इच्छिणाऱ्या लोकांना निजाम हद्दपार करून त्यांची ती चळवळ दडपून टाकी. निजाम सरकारच्या विरुद्ध ती करण्यास स्थानिक जनतेची तयारी नव्हती. निजामानें हद्दपार केलेले श्री. राघवेंद्र शर्मा व आमचे येथील पुढारी कै. शंकरराव परळा यांनीं कामाठीपुऱ्यांतील रहिवाशांची एक जाहीर सभा बोलाविली व मुरारजी वाडींत हैद्राबाद प्रजा परिषद भरविण्याकरितां इ. स. १९२७ सालीं एक समिति नेमण्यांत आली. श्री. सिलम त्या कमिटीचे एक चिटणीस होते. स्थानिक मुसलमानांच्या विरोधाला न जुमानतां ती परिषद यवतमाळचे कै. बादराव माधवराव काळे यांच्या अध्यक्षतेखालीं भरली. परिषदेंतील संमत ठराव त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड रीडिंग यांच्याकडे पाठविण्यांत आले. ४–६ महिन्यांनीं व्हाइसरॉयनीं सहा खास इंग्रज अधिकारी हैद्राबादेंत नेमून गरीब हिंदू रयतेवर होणारे जुलूम पुष्कळ अंशीं कमी केले. ती परिषद यशस्वी करण्यांत श्री. सिलम यांनीं पुष्कळ परिश्रम घेतले. त्या चळवळींत अन्यायाची चीड, निर्भिड वृत्ति, खंबीर परंतु व्यवहारी धोरण, दूरदृष्टि व गरिबांविषयी तळमळ वगैरे त्यांचे अनेक गुण दिसून आले.

## ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद :

ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद हा केव्हांहि समाज हिताय व देशहिताय बाधकच. कांहीं ब्राह्मणेतर पुढारी इंग्रजांना खुष करून स्वार्थ साधण्याकरितां, राष्ट्रीय कार्य करणाऱ्या ब्राह्मणांना शिव्याशाप देत व अज्ञ जनांची दिशाभूल करीत. याला आळा घालण्याकरितां श्री. सयाजी सिलम, कै. रामचंद्रराव गोळे, श्री. डोंगरे, श्री. गणपतराव नलावडे, श्री. शंकरराव पुप्पाला वगैरे मंडळींनीं राष्ट्रीय ब्राह्मणेतर संघ उभा केला. त्या संस्थेच्या विद्यमाने मुंबई, पुणे, नाशिक वगैरे ठिकाणीं सभा, संमेलनें, परिषदा भरवून ब्राह्मण–ब्राह्मणेतर वाद राष्ट्रीय ऐक्याला किती घातक आहे हें आम्ही जनतेला पटवून दिलें. इ. स. १९२७ सालीं मुंबईंत भरलेल्या परिषदेंत सर कै. मोरोपंत जोशी उपस्थित होते व त्यांनीं सभेला चांगलें मार्गदर्शन केलें. या चळवळींत माझी मोठी तारांबळ उडत असे. त्यावेळीं मी मुंबई म्युनिसिपल शाळांचा डॉक्टर असतांना, मुंबई नगरपालिकेंत रा. ब. आसवले, रा. ब. बोले, वगैरे कांहीं ब्राह्मणेतर पुढारी होतेच. त्यांच्यापासून धक्का लागूं नये म्हणून मला फार खबरदारी घ्यावी लागत असे. श्री. सयाजी सिलम पाठीशीं होते म्हणून फारशी भीति वाटत नसे.

या चळवळींत महाराष्ट्रांत निरनिराळ्या ठिकाणीं श्री. सिल्म यांनी सुश्राव्य, तर्कशुद्ध व परिणामकारक भाषणें करून तरुण डाळगेउांत राष्ट्रीय वृत्ति निर्माण केली. यामुळें महाराष्ट्रांतील कॉंग्रेस पुढाऱ्यांचे हात बळकट झाले.

## अस्पृश्यांना देवालयें खुली :

श्री. सयाजी सिल्म व कै. शंकरराव पुप्पाला यांच्या सतत प्रयत्नामुळें तेलगू मुनुरवार ज्ञातिमंडळानें सन १९३० मध्यें कामाठीपुऱ्यांतील आपल्या मालकीचीं सात देवालयें अस्पृश्यांना खुली करण्याची परवानगी मला व कै. विठ्ठलदास अलर्डीदे यांना मुख्य विश्वस्त म्हणून दिली. आम्ही मग पंडित मदन मोहन मालवीयजी यांच्या अध्यक्षतेखाली मोठा समारंभ भरवून तीं देवालयें अस्पृश्यांना खुलीं केल्याचें जाहीर केलें. कॉंग्रेसनें अस्पृश्यतानिवारण हा प्रश्न हातीं घेण्यापूर्वीच श्री. सिल्म यांनी आमच्या भागांतील हरिजनांविषयीं सक्रीय सहानुभूति अनेक वेळां दाखविली होती.

लोकमान्य टिळक वारल्यानंतर त्यांच्या अनुयायांनीं लो. टिळकांचा पुतळा त्यांच्या दहन भूमीवर उभारण्याकरितां एक समिति स्थापन केली. त्या समितीनें काम बरेच दिवस रेंगाळत पडलेलें होतें. नंतर त्या समितीची पुनर्रचना करण्यांत येऊन श्री. सिल्म यांना चिटणीसपदीं नेमण्यांत आलें. श्री. सिल्म यांनीं तो पुतळा उभारण्याच्या कामीं जे परिश्रम घेतले, त्यावरून लो. टिळकांवरील त्यांचें प्रेम, त्यांचा उत्साह, धडाडी, उद्योगप्रियता व कर्तव्यनिष्ठा वगैरे गुण दृष्टोत्पत्तीस आले.

## मारुतीच्या देवालयापाशीं हिंदु-मुसलमानांचा दंगा (इ. स. १९३६)

कामाठीपुऱ्याभोवतीं मुसलमान लोकांची दाट वस्ती आहे. हिंदु-मुसलमान दंग्यांत कित्येक गरीबांना मोहल्ल्याच्या बाहेर जातां येतांना प्राणास मुकावें लागे. ज्या तरुण मंडळींचा अशा बिकट प्रसंगीं त्यांना आधार वाटावा, अशा मंडळींत श्री. सिल्म व कै. शंकरराव पुप्पाला अग्रणी होते. निष्कारण पकडलेल्या लोकांना, दंग्यामुळें बेकार झालेल्यांना आर्य समाजाकडून, हिंदू रिलीफ फंडांतून व स्थानिक धनिकांकडून मदत मागवून त्यांचे हाल दूर केले जात. इ. स. १९३६ सालची गोष्ट. भायखळा येथील मारुतीच्या देवलयावरून हिंदु-मुसलमानांचा फार मोठा दंगा तीन महिन्यांपर्यंत चालू होता.

होम मेंबर ना. बेल् यांनीं दोन्हीं जमातींच्या पुढाऱ्यांना सेक्रेटरिएटमध्यें पाचारण केलें. हिंदूंच्या वतीनें श्री. सयाजी सिल्म, डॉ. सावरकर, श्री. गोवर्धनदास, श्री. तेरसी व मी वगैरे मंडळी त्या सभेत होती. इंग्रजांची आंतून फूस असल्यामुळें त्याचा एक पुढारी म्हणाला, "आमच्या मशिदीसमोर हिंदूंचें देऊळ बांधल्यास मुडदे पडतील. यास्तव तुम्हांला आम्हीं तें बांधूं देणार नाही." त्या वेळचे मेयर मॅ. जमनादास मेहता यांनीं स्पष्टपणें सांगितलें कीं, मुंबई म्युनिसिपालिटीनें तें बांधून देण्याचा करार

देवळाच्या मालकिणीबरोबर केल्यामुळें त्याचें उल्लंघन कॉर्पोरेशनला करतां येणार नाहीं. मुसलमान पुढाऱ्यांनीं केलेला निर्धार हिंदूंना धोकादायक होता. म्युनिसिपालीटिच्या कॉन्ट्रॅक्टरनें कामास सुरवात केली नाहीं तोंच मागल्या मशिदींतून बांधकाम मजुरावर दगडफेक होऊं लागली. संरक्षणाच्या अभावीं मजूर-कॉन्ट्रॅक्टर पळून गेले. बांधकाम तसेंच पडून राहिलें. निरनिराळ्या मोहल्ल्यांत हिंदू-मुसलमानांचे दंगे होऊं लागले. जिकडे तिकडे वातावरण तंग झालेलें होतें. कोणीच कॉन्ट्रॅक्टर काम पुरें करावयास पुढें येईना. अशा वेळीं मी व माझे मित्र के. बाळकृष्ण खांड्रे, श्री. सिलम यांना म्हणालों, "आमच्या मोहल्ल्यांत बांधकाम करणारे मजूर पुष्कळ आहेत. आमचे मित्र के. केशवराव जकल यांच्या नेतृत्वाखालीं काम करूं इच्छिणाऱ्या मजुरांना पोलीस संरक्षण मिळाल्यास तीन महिन्यांच्या आंत तें काम पूर्ण करूं शकतील. तेव्हां म्यु. चे इंजिनियर श्री. नानासाहेब मोडक यांच्याकडे ही सूचना मांडा व तुम्हीं त्यांना हमी द्या, म्हणजे ते आपणांस मदत करतील"

श्री. नानासाहेब मोडक यांनीं श्री. सिलम यांच्या हिंमतीवर तें काम पूर्ण करून घेतलें. देऊळ बांधून होतेवेळीं मुंबईंत निरनिराळ्या ठिकाणीं दंगे चालूच होते. त्या दंग्यांत २००-२५० माणसें प्राणास मुकलीं. देवालयाची वास्तु-शांती होतांना सभोंवती लष्करी पहारा बसविण्यांत आला होता.

मी मुलांच्या आरोग्यासंबंधीं पुस्तकें लिहितांना श्री. सिलम यांनीं योग्य सूचना केल्यामुळें तीं जास्त लोकप्रिय झालीं. तसेंच लंडन येथील रॉयल सॅनिटरी इन्स्टिट्यूटला सादर केलेला प्रबंध त्यांच्या मार्गदर्शनामुळें सर्वोत्कृष्ट ठरला. मुलांच्या आरोग्य संवर्धनार्थ चालू असलेले प्रयत्न पाहूनच इ. स. १९३७ सालीं मला नकळत सरकारी शारीरिक मंडळावर ना. के. बाळासाहेब खेरांना सांगून सदस्य म्हणून त्यांनीं माझी नेमणूक करून घेतली, केवढा हा परोपकार व औदार्य! दुसऱ्याबद्दल गुणग्राहकता दाखविणें हा त्यांचा फार मोठा अनुकरणीय असा गुण आहे.

इ. स. १९३७ सालीं माझगांव येथील ताडवाडींत दिवसा काम करणाऱ्या हरिजन मुलांकरितां मी श्री. वाघमारे यांच्या सहकार्यानें एक मोफत रात्रीची शाळा उघडली होती. त्या शाळेचा वार्षिक खर्च ४००-५०० रुपयांचा असे. परिचयाच्या मंडळींकडून देणग्या गोळा करून मी तो खर्च भागवीत असे. १९३७-३८ सालीं शाळेच्या मदतीकरितां एका धर्मार्थ चित्रपटाचीं तिकिटें विकून पैसा गोळा करण्याचें काम मला जड जाऊं लागलें. सुमारे १५ दिवस अगोदर श्री. सिलम यांना या बाबतींत मदत करावयास सांगितलें होतें. त्यांना सवडच सांपडेना. सिनेमाची तारीख जवळ येऊन ठेपलेली. अवघे दोनच दिवस राहिले होते. आतां माझी फजीति होणार हें निश्चित! "उद्या सायंकाळीं तुझी गाडी घेऊन आणि क्रॉफर्ड मार्केटांत जाऊन तुझीं सगळीं तिकिटें २-४ तासांत मी खपवून

देईन," असें मला त्यांनी आश्वासन दिलें. आणि लवकरच मार्केटांतील फुलवाले, भाजीवाले, फळवाले यांना माझी सारी सिनेमाचीं तिकिटें २–३ तासांत विकून टाकलीं. त्यांचें वजन व पुण्याई यामुळेंच माझी काळजी दूर झाली हेंच खरें!

नागपूर येथें तेलगू मुनुरवार ज्ञातीचे तीन तट पडलेले होते. एक तट दुसऱ्याच पाण्यांत पाही. इ. स. १९४० सालीं त्या तटांचें एकीकरण झाल्याशिवाय तेथें अखिल भारतीय तेलगू मुनुरवार ज्ञाती परिषद भरविणें येणें शक्य नव्हतें. म्हणून श्री. सिल्म व मी असे दोघेजण मिळून इ. स. १९४० सालीं नागपूरला गेलों. तीन–चार दिवसांत श्री. सिल्म त्यांचीं भांडणें मिटवूं शकले. सर्वांची दिलजमाई झाल्यावर दुसऱ्याच महिन्यांत ती परिषद मोठ्या उत्साहानें बडोद्याचे राजरत्न कै. रावतल यांच्या अध्यक्षतेखालीं भरली. परिषदेचे उद्घाटन नागपूरचे प्रसिद्ध नागरिक न्यायमूर्ति नियोगी यांनीं केलें. परिषदेचा मुख्य कार्यवाह जरी मी होतों तरी श्री. सिल्म यांच्या सहकार्यामुळेंच ती परिषद मोठी फलदायक झाली. तेव्हांपासून मुंबई व नागपूर येथील मुनुरवार लोकांमध्यें निर्विघ्नपणें बेटीव्यवहार होऊं लागला.

## कामाठीपुऱ्यांतील भूमय्या यशोनेल डोळ्यांचें मोफत हॉस्पिटल
## (इ. स. १९३९)

मी ते मु. ज्ञातीचा चिटणीस व मॅनेजिंग ट्रस्टी असतांना ज्ञातींतल्या सर्व लहानथोर पुढाऱ्यांशीं माझा निकट संबंध येत असे. वृद्ध पुढाऱ्यांचा मान राखल्यानें व त्यांच्या सल्ल्यानुसार ज्ञातीहिताचीं कार्यें केल्यानें ते संतुष्ट होतात. कामाठीपुऱ्यांत मोफत डोळ्यांचें हॉस्पिटल झाल्यानें गरीबांचें कल्याण होईल ही कल्पना डॉ. के. डी. डी. साठे यांनीं मला व. कै. विठ्ठलराव आलकोंडे यांना सुचविली. त्याच सुमारास आमच्या ज्ञातींतले एक वयोवृद्ध पुढारी श्री. यशोनेल त्यांना झालेला नेत्ररोग बरा झाल्यावर त्यांना भेटण्याकरितां डॉ. साठे यांना घेऊन आम्हीं गेलों. त्यांनीं आमच्या ज्ञातीला देणगी म्हणून त्यापूर्वी ३० हजार रुपये दिलेले होते. त्यांना दुर्दैवानें मूलबाळ नव्हतें. ८–१० हजार रुपये त्यांच्याजवळ आणखी शिल्लक होते. त्यांना आम्हीं विनंती केल्यावर वरील कार्याकरितां त्यांनीं ८ हजार रुपये उदार अंतःकरणानें देण्याचें कबूल केलें. ८ हजार रुपयांत डोळ्याचें धर्मार्थ हॉस्पिटल कसें काय होणार याची आम्हांस शंका वाटतच होती. पण ही अशक्य वाटणारी गोष्ट श्री. सिल्म यांना सांगून झाल्यावर म्युनिसिपालिटीला वरील रक्कम देणगी दाखल देऊन कामाठीपुरा पहिल्या गल्लीच्या नाक्यावर असलेल्या डोळ्याच्या दवाखान्याचें रूपांतर हॉस्पिटलमध्यें करण्याची खटपट त्यांनीं करावी अशी आम्हीं त्यांना विनंती केली.

श्री. सिल्म यांनीं मुंबई म्यु. कमिशनरला भेटून ती देणगी म्यु. कॉर्पोरेशनचा स्वीकारावयास लावली. थोड्याच दिवसांनीं त्या दवाखान्यावर म्यु. नें डोळ्यांचें हॉस्पिटल बांधून काढलें. हॉस्पिटल लहान कां असेना, ते यशोनेल यांचे नेत्ररोगीपीडित गरीबांना उपयोगी पडणारें स्मारक झालें. श्री. सिल्म यांनीं जें असाध्य तें साध्य करून

दाखविल्यामुळें मोहल्ल्यांतील गरीब लोकांनीं त्यांना धन्यवाद दिले. कोणतेंहि लोकोपयोगी सत्कार्य असो तें हातीं घेण्यास अथवा हातीं घेतलेल्या लोकांना मदत करण्यास त्रियांचें पाऊल नेहमीं पुढें असतें. याच वृत्तीमुळें श्री. शिलम यांनीं पुष्कळ माणसें जोडलीं.

## विठ्ठल सायन्ना जिमखाना ( इ. स. १९४० )

तेलगू समजांत कै. विठ्ठल सायन्ना हे फार मोठे बिल्डिंग कॉन्ट्रॅक्टर होऊन गेले. त्यांचे चिरंजीव दि. ब. नारायणराव यांच्याशीं माझा परिचय अनेक वर्षांपासून होता. पण येथील तेलगू समाजातल्या पुढाऱ्यांशीं मात्र त्यांचा संबंध आलेला नव्हता. तेलगू श्री लायब्ररीचा ७४ वा वार्षिकोत्सव १९३७ मध्यें त्यांच्या अध्यक्षतेखालीं पार पडल्यावर कामाठीपुऱ्यांतील अनेक पुढारी मंडळी त्यांच्या ओळखीची झाली.

आमच्या क्रिकेट क्लबला व व्यायामशाळेला स्वतंत्र इमारतीची फार जरूरी होती. दि. ब. नारायणरावांना मी व श्री. शिलम अशा दोघांनीं मिळून आमच्या श्री. मरिअम्मा-देवीच्या देवालयानजिक असलेल्या म्युनिसिपालिटीच्या मोकळ्या जागेवर ती बांधून द्यावी अशी विनंती केली. ती त्यांनीं मान्य केल्यावर श्री. शिलम यांनीं मुंबई नगरपालिकेंत आपलें वजन खर्च करून म्युनिसिपालीटीचें तें पटांगण एक रुपयाच्या भाड्यानें तेलगू क्रिकेट क्लबला देवविलें व त्याच पटांगणांत दिलेल्या वचनानुसार दि. ब. नारायणराव यांनीं आपल्या वडिलांच्या स्मरणार्थ वरील संस्थांकरितां एक सुंदर व आकर्षक इमारत बांधून दिली. एखादें सार्वजनिक कार्य हातीं घेतल्यावर तें तडीस जाईपर्यंत श्री. शिलम निर्लोभीपणें सतत प्रयत्न करतात, हें अनेक उदाहरणांवरून मी सांगूं शकेन. तेलगू समाजाच्या कीर्तींत त्यांनीं आपल्या बहुविध कर्तृत्वानें मोलाची भर टाकली आहे.

## अखिल भारतीय ते. मु. शांति-परिषद् हैद्राबाद इ. स. १९४६

श्री. शिलम यांचे ज्ञातिबांधव महाराष्ट्रांत व दक्षिण हैद्राबादेंत निरनिराळ्या ठिकाणीं विखुरलेले आहेत. त्यांना संघटित करून त्यांच्यांत चैतन्य व राष्ट्रीय वृत्ति निर्माण करण्याच्या दृष्टीनें अखिल भारतीय परिषदा, मुंबई, नागपूर व हैद्राबाद येथे भरविण्यांत आल्या. इ. स. १९४६ सालीं माझ्या अध्यक्षतेखालीं हैद्राबाद येथील परिषद भरण्यापूर्वी कांहीं भानगडी निर्माण होऊन परिषद नामशेष होणार होती. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं श्री. शिलम यांनीं सामोपचारानें हेवेदावे मिटवून सर्वांची समजूत काढली. म्हणून ती परिषद यशस्वीरित्या पार पडली. श्री. शिलम हे जितके संघटनाचतुर, न्यायनिष्ठुर व कर्तव्यकठोर राहिले तितकेच ते सहृदय आणि भावनाप्रधान आहेत, हें त्यावेळीं दिसून आलें.

## श्री. गणेशोत्सव व शिवराज्याभिषेक दिनोत्सव:

इ. स. १८९८ पासून कामाठीपुरा तिसऱ्या गल्लीत लो. टिळकांच्या आदेशानुसार कै. शिवबा व कै. भूमय्या स्वर्गीय यांच्या खटपटीमुळे प्रतिवर्षी श्री. गणेशोत्सव साजरा होत असे. सात-आठ वर्षांनंतर तेलगू मित्र मेळा स्थापण्यांत येऊन कै. धोंडिबा पांडू बनकर व कै. शांभा मागोजी हार्मंद यांच्या नेतृत्वाखाली त्यांतील मुले मुंबईतल्या निरनिराळ्या भागांत जाऊन स्वदेशप्रेम, स्वदेशी वस्तूंचे महत्त्व यांवर त्यावेळीं प्रचलित असलेल्या सामाजिक व धार्मिक रुढींच्या विरुद्ध पदें गाऊन लोक-जागृतीचें कार्य करीत असत. इ. स. १९०८ नंतर त्या मेळ्याचें विसर्जन करण्यांत आलें. व शेट राजू बाबाजी यांच्या सत्रींच्या चाळींत होणारा सार्वजनिक गणेशोत्सव इ. स. १९१४ पासून बंद पडला. इ. स. १९२४ पासून मी व श्री. सिल्म तेलगू बा. शा. समाजाच्या विद्यमाने तो सुरू केला. तो आज एकाच ठिकाणीं नव्हे तर कामाठीपुऱ्यांतल्या प्रत्येक गल्लीत गेल्या १०-१५ वर्षांपासून दर वर्षी धूमधडाक्यानें व मोठ्या उत्साहानें साजरा होत असतो.

इ. स. १९२७ पासून श्री शिवजयंति-उत्सव आम्ही दोघांनीं मिळून सुरूं केला. पण गेल्या सहा-सात वर्षांपासून दर वर्षी शिवाजी राज्याभिषेक दिनोत्सव समितीच्या विद्यमाने शिवरायांचा राज्याभिषेक दि. ६ जून रोजीं साजरा होऊं लागला. इ. स. १९६० सालीं त्या उत्सवाचें उद्घाटन श्री. सयाजीराव सिल्म यांनीं केलें. मी लिहिलेल्या शिवचरित्र प्रकाशन समारंभाचें उद्घाटन करावयास पुढल्या वर्षी येण्याची त्यांना विनंती केली. इ. स. १९६१ सालीं शिव राज्याभिषेक दिनोत्सवाच्या दिवशीं माझ्या पुस्तकाचें प्रकाशन, शिवनेरकार श्री. वाबळे यांनीं जिना हॉलमध्यें ना. पवनवार यांच्या अध्यक्षतेखाली भरविलेल्या पुस्तक प्रकाशन समारंभाचें उद्घाटन गेल्या वर्षी दिलेल्या वचनानुसार श्री. सिल्म यांनीं केलें.

त्यांनीं आपल्या भाषणांत, शिवाजीचें शौर्य, मुत्सद्दीपणा, स्वातंत्र्यप्रेम, पवित्र आचरण, स्त्रीदाक्षिण्य, परधर्मसहिष्णुता वगैरे गुणांमुळें आजहि शिवाजीच्या पुतळ्याकडे पाहून, भारतानेंच काय पण सर्व जगानें मान डोलवावी, असाच या महाराष्ट्राचा राजा होऊन गेला-असे स्फूर्तिदायक उद्गार काढले व मी लिहिलेल्या पुस्तकाचें कौतुक केलें. श्री. सयाजी सिल्म यांच्या मनांत आपल्या मित्राबद्दल आपलेपणाची भावना किती असते तें अशा प्रसंगीं ठळकपणें दिसून येतें.

श्री. सयाजीराव सिल्म स्वभावानें शांत, निर्व्यसनी व सत्त्वशील दर्शेच मानी वृत्तीचे आहेत. सार्वजनिक कार्य करतांना राजकीय पक्षांतील भेद आपल्या कार्यांच्या आड श्री. सिल्म येऊं देत नाहीत. आपल्या सवंगड्यांशीं चेष्टा मस्करी करण्यांत त्यांना मौज वाटते. आपलें मोठेपण विसरून ते सामान्य लोकांशीं समरस होतात. त्यांच्याविषयीं त्यांच्या लहान-थोर मित्रांमध्यें विलक्षण प्रेम व नितांत आदर वसत आहे.

महाराष्ट्र विधान सभेचे सभापति या नात्यानें श्री. सिलम यांनी केलेल्या कामगिरी वर 'मराठा' पत्राचे संपादक आचार्य अत्रे यांनी अग्रलेख लिहून जनतेतर्फे त्यांचें अभिनंदन केलें. त्यांची उत्कृष्ट कामगिरी ध्यानीं आणून सरकारनें पाँदिचरीचे ले. गव्हर्नर म्हणून त्यांची नेमणूक जेव्हां केली, तेव्हां महाराष्ट्रांतील सर्व लोकांना, विशेषतः तेलगू समाजांतील लहान थोर मंडळींना आनंद झाला.

मुंबईतील तेलगू मुनुरवार ज्ञातीनें माझ्या अध्यक्षतेखाली ता. १–२–१९६४ रोजी सायंकाळी तेलगू मुनुरवार वाडींत (कामाठीपुरा १० वी गल्लीच्या नाक्यावरील) त्यांचा सन्मान मोठ्या थाटामाटांत केला. सुरवातीस मी माझ्या भाषणांत म्हणालों कीं, श्री. सिलम स्वातंत्र्य चळवळींत न पडतां आपल्या लोकांप्रमाणें इमारती बांधकामाचीं कंत्राटें घेत राहिले असते तर त्यांनीं व्यवहारचातुर्यानें लक्षावधी रुपये सहज मिळविले असते त्यांनीं इ. स. १९१८ पासून तर आजपावतों समाजाची व देशाची सेवा निःस्वार्थ बुद्धीनें केल्यामुळे ते थोरपदावर चढले आणि त्यांनीं वैभव व कीर्ति संपादन केली.

तेलगू समाजांत कार्य करतांना, मुंबईतल्या निरनिराळ्या संस्थेंत सामाजिक व शैक्षणिक कार्य करीत असतांना, मुंबई नगरपालिकेंत अनेक वर्षे मुंबई शहराची सेवा करीत असतांना, नेतृत्वाला लागणाऱ्या अनेक गुणांचा विकास श्री. सिलम यांना करण्याची संधि मिळाली. कॉंग्रेसच्या स्वातंत्र्य चळवळींत हे सारे गुण त्यांना उपयोगी पडून कॉंग्रेस संघटना उत्कृष्टरित्या बळकट करतां आली. विधान सभेंत प्रतोद व इ. स. १९५७ पासून विधान सभेचे सभापति या नात्यांनीं त्यांनीं केलेली कामगिरी चिरस्मरणीय झालेली आहे. माझे एक भाग्यवान, चारित्र्यसंपन्न व कर्तृत्ववान मित्र श्री. सिलम यांचे गुणगान करण्याची संधि मिळाल्याबद्दल मला आज धन्यता वाटत आहे. त्याच्या व्यक्तित्वाचें व विविध गुणांचें वर्णन वाचून तरुणांना देशकार्याची स्फूर्ति मिळो अशी माय भवानीजवळ प्रार्थना करून हा अल्पपरिचयात्मक लेख पुरा करितों.

# आमचे बाबा

लेखीका—कु. रतन सयाजी सिलम,
बी. ए. (Hon.) बी. टी; डी. बी. एड्.

आम्ही लहान असतांनाच्या गोष्टी आठवल्या की, बाबांच्या स्वभावांत आज झालेला बदल फारच जाणवतो. आज घरांत मुलं, जांवई, नातवंडें, पणतवंडें यांची त्यांच्याशी फार मोकळी वागणूक दिसेल. स्वभावांतील करडेपणा खूपच कमी झालेला दिसेल. तसें पाहिलें तर आम्हा भावंडाना ते लहानपणी रागावले, ओरडले असें कधी आठवत नाही. परंतु त्यांची भव्य मूर्ति, गंभीर वृत्ती व एकंदर व्यक्तित्वाचाच इतका दरारा वाटे की, प्रत्येकजण त्यांना वचकून असे. ते घरांत आले की, घराच्या कोन्याकोपऱ्यांतून त्यांची चाहूल लागे व घर एकदम शांत होई. घरांतली माणसें आपापल्या कामात मग्न व चुपचाप असत. सर्व वस्तु जिथल्या तिथें लावल्या जात. त्यांना अव्यवस्थितपणा मुळींच खपत नाही. त्यांच्या टेबलावरील एकहि कागद इकडचा तिकडे झाल्यास ताबोडतोब त्यांच्या लक्षांत येई. आम्ही मुलें रात्री कधी उशीरा येणें किंवा रात्रीच्या सिनेमाला जाणें त्याना आवडत नाही. कोणीहि विशेष कारणाशिवाय उशीरा आलें की, त्यांना आरोपीच्या पिंजऱ्यांत उभे राहावें लागे व उशीरा येण्याचें कारण सांगावें लागे. आम्हीच काय पण त्यांच्या बरोबरीचे आमचे काकाहि या बाबतींतलें त्यांचें पथ्य काटेकोरपणें पाळीत असत.

तसा आमचा मुलांचा बाबांशी फारसा संबंध येत नाही. कारण बाबा बाहेरून येतात ती गर्दी घेऊनच व बाहेर जाईपर्यंत त्यांच्याबरोबर माणसें असतात व जातांना ती गर्दी घेऊनच ते बाहेर पडतात. तरी घरांतील सर्व बारीक सारीक गोष्टी त्यांच्या नजरेंतून सुटत नाहीत. आमच्याकडे अजूनहि एकत्र कुटुंबपद्धति आहे. कुटुंबाचा व्यापहि मोठा आहे. पण कुटुंबातील सर्वांना एकाच पद्धतीनें वागवलें जातें. आपल्या भावाच्या मुलांना त्यांनीं पोटच्या पोरांपेक्षाहि जास्त प्रेमानें वाढवलें व त्यांचे सर्व कांहीं आमच्याप्रमाणेंच ते करीत आले. तरीसुद्धा त्यांच्या जबाबदारींतून आपण मुक्त झालों असे त्याना वाटत नाहीं. पूर्वीइतक्याच जबाबदारीनें व आस्थेनें आजहि ते सर्व कुटुंबाची देखभाल करीत आहेत. तेच संस्कार लहानपणापासून आमच्या मनावर झाल्यामुळें

सध्याच्या आपल्या पलीकडे कोणाचेंहि न पहाण्याच्या दिवसांत आम्ही भावंडें एकमेकांचे मोठ्या आपुलकीनें करत असतों. पुढची हमी कोणी द्यावी ? ५५२१४

सार्वजनिक कार्यांच्या व्यापामुळें बारीक सारीक सांसारिक अडचणींकडे त्यांना लक्ष देतां येत नाहीं. परंतु त्यांच्या मोठ्या जांवयांनीं हा भार बराचसा उचललेला आहे. त्यामुळें आमच्या आईवडिलांचा त्यांच्यावर पूर्ण विश्वास आहे. बाबा तुरुंगांत असतांना आईला व आम्हां मुलांना त्यांचा खूपच आधार वाटला.

बाजारांत कोणतेंही नवीन पुस्तक आलें कीं, ते बाबांच्या वाचनालयांत हटकून सांपडेल. कितीहि काम असो, थकलेले असोत, जेवणानंतर रात्री बारा वाजेपर्यंत वाचत बसण्याचा त्यांचा आवडता छंद आहे. कोणतीहि आवश्यक गोष्ट शिकण्याची त्यांची या वयांतहि तयारी असते. आज ते पॉंदिचरीला राज्यपाल म्हणून काम करीत असतांना त्यांना फ्रेंच भाषा शिकावीशी वाटते व त्यासाठीं मुद्दाम फ्रेंच शिक्षिका ठेवून त्या भाषेचा ते अभ्यास करत आहेत.

त्यांच्या जीवनांतील महत्त्वाची गोष्ट म्हणजे त्यांचा वक्तशीरपणा. त्यांच्या पहाटें उठण्याच्या, बाहेर फिरायला जाण्याच्या, जेवणाच्या वेळेवरून कोणीहि आपलें घड्याळ लावावें.

कौटुंबिक जीवनाच्या दृष्टीनें बाबा अतिशय भाग्यवान आहेत. आपल्या नातवंडांच्या, पणतवंडांच्या मेळाव्यांत ते रंगून जातात. बाबांना जेवतांना बरोबरीनें नातवंडे आजूबाजूला लागतात. त्याशिवाय त्यांना चैन पडत नाहीं. दर वर्षीचा त्यांचा एक आवडता कार्यक्रम म्हणजे सर्व वानरसेना गोळा करून थोड्या दिवसांकरितां का होईना पण थंड हवेच्या ठिकाणी जाणें. या दिवसांत दिवसभर फेरफटका मारणें, खाणें, पिणें, खेळणें व आजोबांशीं गप्पा मारणें हाच मुलांचा कार्यक्रम असतो. आईवडील बरोबर येवोत न येवोत आजोबांबरोबर जाण्यास प्रत्येकजण तयार असतो. आजहि पॉंदिचरीहून ते मुंबईला आले कीं, हा बालगोपाळांचा मेळावा त्यांच्या स्वागतासाठीं हंसतमुखानें उभा असतो. इथें आल्यावर ते आपला मुक्काम राजभवनांत न ठेवतां या बच्चा मंडळीसाठीं खेतवाडींतच ठेवतात.

एकदां काय झालें, आम्ही मलबारहिलवर होतो व बाबा मुलांना घेऊन कोयनेला जाण्याचा बेत करीत होते. आम्ही बायकांनीं कोणीहि जायचें नाहीं असें ठरविलें. परंतु बाबांनीं सर्व मुलांना व बरोबर थोंडू वाढेवाल्याला घेतलें व मंडळी गेली. चार सहा दिवसांनंतर सारी मंडळी परत आली तेव्हा थोंडू सांगूं लागला, बाई तुम्ही कोणी आला नाहींत परंतु साहेबांनीं मुलांचें इतकें व्यवस्थित केलें कीं, मलाहि मोठें आश्चर्य वाटलें. आजोबा असले कीं, नातवंडांचें कोणावाचून अडत नाहीं.

आमची आई बाबांच्या मोठेपणाला साजेल अशाच वृत्तीची आहे. ती अतिशय शांत व आनंदी वृत्तीची आहे. ती कधीं कोणावर रागवत नाहीं व कोणाला आलेला राग तिला समजत नाहीं. तिचा उत्साह दांडगा आहे. कंटाळा हा शब्दच तिला माहीत नाही. या वयांतहि कोणीहि लहान मोठा श्रीमंत गरीब पाहुणा घरीं येवो त्याचें ती मनापासून स्वागत व पाहुणचार करते. बाबांकडे येणारा कितीही मोठा माणूस असो व त्याची भाषा कोणतीहि असो, तिला भाषेची अडचण वाटत नाही व वागण्याच्या पद्धतीचा प्रश्न पडत नाहीं. मोठेपणाचा लवलेश तर तिच्या बोलण्याचालण्यांत कोठेंच आढळणार नाहीं. तिच्या साध्या व मनमिळाऊ स्वभावानें ती येणाऱ्या प्रत्येक व्यक्तीशीं स्नेहसंपादन करते. बाबाकडे येणारीं सर्व माणसें बाबांपेक्षा आईलाच जास्त मानतात. कोणत्याहि प्रकारचा न्यूनगंड न बाळगतां ती नेहेमी बाबांच्याबरोबर प्रत्येक समारंभाला हजर असते व बाबाहि तिला प्रत्येक ठिकाणीं मोठ्या मानानें नेतात. आधुनिक संसारांत दिसणारे मतभेद बाबा–आईंच्या जीवनांत आम्ही मुलांनीं कधींच पाहिले नाहीत. इतकेंच काय पण मुली, जांवई, मुलगे सुना यांच्याबरोबरहि तिचें कधींच खटकलें नाही. अशा या आईवडिलांच्या छायेंत परमेश्वरानें नेहमी सुख द्यावें हीच प्रार्थना.



# सहेचाळीस वर्षें सहकार

डॉ. वा. रा. नायन

सन १९२० सालची गोष्ट. आमच्या समाजातर्फे श्री. स. ल. सिल्म यांचा एल. एल. बी. झाल्याबद्दल सत्कार होणार होता. आमंत्रणपत्रिका वाटण्याचें काम मी स्वतः होऊन घेतलें होतें. समारंभास मी हजर होतों. त्यांना मी पहिल्यांदाच पहात होतों. सडपातळ उंच काठी, भेदक डोळे आणि करारी आवाज पाहून ऐकून भारून गेलों मी. सत्कारप्रसंगी दिलेली थैली शिक्षण फंडाला देऊन समाज व राष्ट्रसेवेला वाहून घेण्याची मनिषा आपल्या भाषणांत त्यांनीं व्यक्त केली. मनानें आणि बुद्धीनें सर्वस्वी आकर्षिला गेलों मी. सार्वजनिक जीवनांत मनस्वी त्यांचा शिष्य झालों. माझ्यावरचें त्यांचें तें मानाचें स्थान अजूनही तसेंच टिकून आहे. त्या दिवसापासून, ते सभापति होईपर्यंत त्यांनीं भाग घेतलेल्या प्रत्येक कार्यांत मी स्वयंसेवक, अनुयायी अथवा सहाय्यक अशा कोणत्या ना कोणत्या स्वरूपांत असेंच. न्यायालयाकडून त्यांना पुष्कळ वेळा लवाद नेमण्यांत येई. अशा प्रसंगीं मिळालेले पैसे त्यांनीं प्रत्येक वेळीं शिक्षण फंडाला देऊन टाकले आहेत.

जुना 'ई' वॉर्ड म्हणजे ज्यांत कामाठीपुरा, नागपाडा, भायखळा व माझगांव वगैरे भाग होता हें त्यांचें मूळचें कार्यक्षेत्र. सामाजिक कार्याकडे त्यांचा विद्यार्थीदशेपासून कल होता. या कर्मभूमींत समाजाचे सर्वच तऱ्हेचे घटक आहेत, सुशिक्षित–अशिक्षित, सालस, आडदांड, मजूर–भांडवलदार, हिंदु–मुसलमान, धर्ममोळे–गुन्हेगार असा बहुरंगी वॉर्ड आहे आमचा. अशा या पार्श्वभूमींत त्यांचें नेतृत्व फळाला लागलेलें आहे. त्यांचें कार्यक्षेत्र आकुंचित न राहतां झपाट्यानें वाढत गेलें. कोणतेंहि काम एकदां हातीं घेतलें कीं, त्याची योजनाबद्ध आखणी करून तें तडीस नेईपर्यंत त्याचा पिच्छा पुरवायचा हा त्यांचा स्वभावधर्म. आपल्या सहकाऱ्यांनीं केलेली दिरंगाई व अव्यवस्थितपणा त्यांना कधींच खपत नाहीं. या त्यांच्या धारेवर धरण्याच्या स्वभावामुळे केक कार्यकर्ते सामाजिक व राजकीय क्षेत्रांत निष्णात झाले आहेत. अनुयायांकडून दर्जाला सोडून केली गेलेली उपेक्षा ते कधींच सहन करीत नाहीत. अशा प्रसंगीं कार्यकर्त्यांचा रोष ओढवून देखील सिल्म त्यांना मुकले आहेत, पण सवंग लोकप्रियतेच्यामागे लागले नाहीत. कोणत्याहि सभेचें अध्यक्षपद म्हणजे त्यांचा हुकमी एक्का. अनेक संस्थांच्या हजारो सभांच्या अध्यक्षस्थानीं मी त्यांना प्रत्यक्षांत पाहिलें आहे. प्रश्न कितीही बिकट असो, प्रश्न कितीही गुंतागुंतीचा असो, अथवा माणसें कितीही हटवादी असेनात, सिल्म अध्यक्षस्थानीं असले कीं सभेचा शेवट सुरळीत व्हायचाच पाहिजे. तुफानी समारंभें भरकटलेलें तारूं सुरक्षित किनारीं लावण्यांत

त्यांचा हातखंडा. हा त्यांचा गुण द्विभाषिक मुंबईच्या व संयुक्त महाराष्ट्राच्या विधान सभेच्या सभापतिस्थानी प्रकर्षाने दिसून आला. महापौर स. का. पाटील व सभापति सिलम यांची कारकीर्द मुंबईकर विसरू शकत नाहीत.

सार्वजनिक संस्था व कार्यासाठी निधि गोळा करण्यांत श्री. सिलम नेहमीच यशस्वी. पैशांची उणीव भासली की, कार्यकर्त्यांनी सिलमांकडे धांव घ्यायची हें ठरलेलें. एकदां एका धनिकाकडे आम्ही त्यांच्यासह मदत मागण्यासाठी गेलों. त्या गृहस्थानें अत्यंत उद्धटपणें त्यांचा अपमान केला. माझा पारा चढत गेला. सिलमांची स्वारी मात्र बर्फासारखी थंड. शेवटी तासभराच्या चर्चेनंतर एकावन्न रुपयांची देणगी, हसतमुखानें स्वीकारून आम्ही बाहेर पडलों. सार्वजनिक कार्यांत ते इतरांशी वागतांना कसल्याही प्रसंगी रागावत नाहीत. फक्त त्यांच्या चेहेऱ्याचीच दहशत लोकांना. त्या मानानें माझा स्वभाव फारच तापट आणि म्हणून मला, वरच्यावर कान-पिचक्या मिळत. त्यांच्यामुळेंच माझा तापटपणा आज बोथटलां आहे. सन १९२२ साली जुन्या 'ई' वॉर्डांतून मुंबई नगरपालिकेंत पहिल्या क्रमांकानें निवडून आले तेव्हां मी छातीवर रुबाबाने 'पट्याळ' (निशाणीचें) लावून स्वयंसेवकाचें काम केलें आहे. पहिल्या दोन निवडणुकांत आमचा उमेदवार पहिला आला याचा आम्हांला फार अभिमान वाटायचा. पण आमच्या मनाची ही धारणा त्यांनी फार दिवस टिकूं दिली नाहीं. आपलीं मतें दुसऱ्या उमेदवारांना देवून त्यांना निवडून आणण्यास आम्हांस भाग पाडीत. एका प्रसंगाची आठवण आज-हि ताजी आहे. दिनांक ७-२-१९३९ रोजी मुंबईच्या कॉंग्रेस पक्षानें मुंबई नगर पालिकेच्या निवडणुका पहिल्यांदाच लढविल्या. श्री. स. का. पाटील व श्री. सिलम यांनीं आपल्या पक्षाचे उमेदवार बहुसंख्येनें निवडून आणण्याचा चंग बांधला होता. 'ई' वार्डांतून सिलमांसहित तीन उमेदवार होते. खरली मतविभागणी करावयाचे ठरून-देखील आपण पडू कीं काय या भीतीनें प्रत्येकानें आपल्यापुरतें पहावें हा अनुभव सुरवातीपासूनचा सर्वांचच आहे. हे प्रत्यक्षांत दिसत असूनही आपल्या मतदाराचीं मतें तिघांना सारखीं वाटलीं जावीत असा आग्रह, नव्हे सक्ति त्यांनीं आमच्यावर केली. मी तर मेटाकुटीस आलों. आमच्या दोषांचे क्षणोक्षणीं मतदानेंद्रावर खटके उडूं लागले. त्यांचें एकच पालुपद—'माझ्या पक्षाचे जास्तीत जास्त उमेदवार निवडून आणण्याची जबाबदारी माझी आहे. ती जबाबदारी पार पाडतांना मी पडलों तरी चालेल.' दिनांक ८ फेब्रुआरी १९३९ ही काळरात्र वाटली मला. कॉंग्रेस निवडणुकींत बहुसंख्येनें यशस्वी झाली, पण सिलम पडले. माझ्या संतापाला पारावार नव्हता. आम्ही सर्वजण चवताळलो होतो, पण ही स्वारी थंड. भावना ताब्यांत ठेवण्याचा इतका बिकट प्रसंग सार्वजनिक जीवनांत मजवर कधींच आला नसेल. आम्ही तत्वासाठीं लढत असतांना चार मतानें पडलो. इतरांना मतें देवविणाऱ्या व निवडून आणणाऱ्या उमेदवारावर हा प्रसंग यावा याचीच आम्हांला चीड. आम्ही न्यायालयांत गेलों. खोट्या मतदानाची माहिती मतदारांनीं स्वतः होऊन कसलीहि

अपेक्षा न करतां दिली व श्री. सिलम निवडून आल्याचा निकाल न्यायालयानें दिला. सत्याचा विपरित जयच नव्हे का हा ! आज २७ वर्षांनीं मी जेव्हां या प्रसंगाकडे पहातों तेव्हां हा प्रसंग श्री. सिलम यांच्या सार्वजनिक जीवनांतील अत्यंत उज्वल प्रसंग वाटतो मला. या अपेशांत त्यांच्या यशाचें खरें सार आहे, त्यांतच त्यांची थोरवी आहे. आज पक्षीय राजकारणांत या निष्ठेची पूर्वी कधींहि नव्हती इतकी आवश्यकता आहे.

नगर पालिकेंत असतांना 'Post War Reconstruction Committee' च्या 'Housing Panel of the Bombay City and Suburbs Post-War Development Committee' चे अध्यक्ष या नात्यानें १९४६ मध्यें आपल्या अहवालांत मुंबईच्या पुनर्रचनेच्या व घरबांधणीच्या महत्वाच्या सूचना केल्या. एकवीस कोटी रुपयांच्या या योजनेंत 'Every man, a dwelling: every dwelling a home' हें ब्रीद वाक्य त्यांनीं अवलंबिलें. दैनिक 'लोकमान्या'नें या अहवालाचें 'मुंबईकरांसाठी एक गोड स्वप्न' म्हणून वर्णन केलें. श्री. होमी तल्यारखानांनीं २९-६-४६ च्या 'ब्लिट्झ'-मध्यें 'Silam Plan for Housing Relief' ची सविस्तर चर्चा केली. आजच्या मुंबईच्या घरबांधणीची ही अशी सुरवात !

श्री. सिलम मद्यपानबंदीचे कट्टे पुरस्कर्ते आहेत हें सर्वांना विदितच आहे. या कार्याची मुहूर्तमेढ त्यांनीं सन १९१६ सालीं रोवली. 'तेलगू मद्यपान निषेधक मंडळ' कै. रा. ब. मानाजी राजूजी कालेवार यांच्या अध्यक्षतेखालीं—

"कोणाही इसमास कोणत्याही मादक पेयांपासून परावृत्त करणें, व मादक पेयांपासून दूर राहणाऱ्या सर्व लोकांस एके ठिकाणीं संकलित करणें."

या उद्देशानें स्थापिलें गेलें. या मंडळाचे चिटणीस या नात्यानें सिलमांनीं मद्यपान निषेधाचें कार्य हिरीरीनें केलें. मद्यपान निषेध सभा, वर्तमानपत्रांतून प्रचार, कलेक्टर, पोलीस कमिशनर व नगरपित्यांकडे विनंति अर्ज व निषेध खलिते अशा विविध स्वरूपांत त्यांनीं आपल्या सहकाऱ्यांसह मोहिम चालू ठेवली. सन १९१८-१९-२० अशीं तीन वर्षे वार्षिक संमेलनें भरविलीं. या कार्यांत त्यांना कै. माधवराव महादेव खांडे, कै. ना. म. जोशी, कै. स. भा. हार्मद, डॉ. वि. रा. भुस्कुटे, कै. उद्धाजी ई. कुडतल, श्री. स. भू. आचार वगैरे कार्यकर्त्यांची मदत होती. 'Indian Tea Cess Committee' या संस्थेनें चहाच्या प्रचारासाठीं साडेतीन लाख रुपये खर्च केले. मद्यपानापासून परावृत्त करण्यासाठीं चहाचीं दुकानें उघडावीं अशी विनंती त्यांनीं सिलमांना केली, पण ही परदेशी भांडवलदारी कल्पना त्यांनीं स्विकारली नाहीं. The Bombay Humanitarian League नें मुंबईत 'The Third Humanitarian Conference' डॉ. ॲनी बेझंट यांच्या अध्यक्षतेखालीं भरविली. श्री. बी. जी. हॉर्निमन स्वागताध्यक्ष होते. श्री. सिलमांनीं मद्यपान निषेधासाठीं या परिषदेंत प्रामुख्यानें

भाग घेतला. गणपती व मोहरमच्या दिवसांत दारू-ताडीचीं दुकानें बंद ठेवावीत अशी सूचना त्यांनीच प्रथम केली. त्यानंतर दारू-ताडीच्या गुत्त्यांच्या निरोधनाच्या सार्वत्रिक चळवळींत त्यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला. आम्ही स्वयंसेवकांनीं 'दारू पीना हराम है, ताडी पीना खराब है,' अशा घोषणा करून गुत्त्यापुढें निरोधनें केलीं.

लेखक या दृष्टीनें त्यांनीं फारसें कांहीं लिखाण केलें नसलें तरी ठराव-मसुदे-अहवाल -भाषणें वगैरे लिहिण्यांत त्यांचा हातखंडा. मराठी व इंग्रजी दोन्ही भाषा चांगल्या अवगत. कॉलेजमध्यें असतांना त्यांची दुय्यम भाषा 'फारसी.' सन १९१४ सालीं प्रसिद्ध 'करमणूक' पत्रांत सादी कवीच्या ७७ फारसी कवनांचें भाषांतर प्रसिद्ध करण्यांत आलें. त्यानंतर 'गीतालाप' या नांवाचें १०१ कवनांचें पुस्तक तेलगू बालज्ञानोत्तेजक संस्थेनें प्रकाशिलें. पुढें तुरुंगात असतांना त्यांनीं आपल्या फारसी व उर्दू भाषेच्या ज्ञानाला उजाळा दिला. तुरुंगांत असतांना त्यांनीं हिंदी भाषेचा विशेष व संस्कृत भाषेचा थोडासा अभ्यास केला. हल्ली पॉंदिचरीस ते फ्रेंच शिकत आहेत. आम्ही तेलगू फक्त बोलतों पण ते लिहूं वाचूं शकतात.

कामाठीपुऱ्यातील लोक मूळचे व्यायामप्रेमी. सन १९२७ सालीं मे महिन्यांत त्रिशत्-सांवत्सरिक शिवजयंती मोठ्या इतमामानें साजरी झाली. तसा सोहाळा मी अद्याप पाहिलेला नाहीं. डॉ. वि. रा. भुस्कुटे, श्री. द. वा. मंद्रे, के. धर्माजी लं. पुप्पाला वगैरे सहकाऱ्यांच्या सहाय्यानें आखाड्यांचें पुनर्जीवन करण्यांत आलें. तरुण पिढीला लाठी व आसनांचेंहि शिक्षण देण्यांत आलें. पुढें कुस्तीगीर संघ व इतर शारिरिक शिक्षणाच्या चळवळींत त्यांनीं आस्थेनें भाग घेतला, त्याचा उगम कामाठीपुऱ्याच्या आखाड्यांत आहे.

कामाठीपुऱ्याच्या आसपास असलेल्या वेश्यांचें उच्चाटण करण्याची चळवळ फार जुनी. श्री. सिलम व त्यांच्या मित्रमंडळींनीं या प्रश्नास चालना दिली. डॉ. गोपाळराव देशमुख मध्यवर्ती विधानसभेंत असतांना एका रात्रींत ५००० सह्यांचा विनंति-अर्ज दिल्लीस पाठविण्यांत आला. दुर्दैवानें अजूनहि त्या वस्तींतून वेश्यांचें पूर्णपणें उच्चाटण झालेलें नाहीं.

सुरवातीस सिलमांचें लक्ष घरांत यथातथाच. घरांत सर्वंच नेहमीं वचकून असत. माझ्या लग्नानंतर घरांतील मंडळींची गाऱ्हाणी नेहमीं माझ्याकडूनच त्यांच्याप्रत जायचीं. आतां मात्र नातवंडांच्या अस्तित्वात वातावरण मवाळ झालें आहे. बाहेर सार्वजनिक जीवनात खंबीर मनानें वागणारा हा नेता एका बाबतींत अगदीच कच्च्या दिलाचा. कुटुंबियांत कोणीहि आजारी पडला की खंबीर सिलम पूर्ण गर्भगळित. रोग्यापेक्षां यांच्याच मनाची समजूत घालणें कठीण. आम्मा (सौ. सिलम) प्रकृतीनें यथातथाच पण स्वभावानें अत्यंत प्रेमळ. पहाटें उठल्यापासून तों रात्रीं झोंपेपर्यंत सर्वांचें करण्यांत त्यांची प्रकृति आड येत नाहीं. आल्यागेल्यांचा पाहुणचार स्वतः जातीनें केल्याशिवाय त्यांना चैनच पडत नाहीं.

श्री. शिलमांची खंड न पडतां कसली व्यसनें टिकली असतील तर तीं चहापान व वाचन दररोज रात्रीचें त्यांचें वाचन चुकत नाहीं. त्यांना अगदीं गरम चहा लागतो. त्यांच्या बाबतीत, 'Any time is tea time' म्हणायला हरकत नाहीं. हा चहाचा वारसा त्यांच्या मुलींनीं घेतला आहे. मांसाहार आवडत असला तरी जेवणाची त्यांची फारशी तक्रार नसते. अळणी आहे कीं खारट हें इतरांनीं जेवण घेतलें म्हणजेच कळायचें. त्यांना पटसे झालें कीं, आमच्याकडे बोंबलाची कढी हमखास असते. मुलगा व सून मात्र शाकाहारी. श्री. शिलमांना पूर्वी तपकिरीचें व्यसन त्यांच्या मित्रांकडून लागलें होतें. योगीहि आलें कीं, त्यांनीं तपकिरीची डबी पुढें केलीच. तुरुंगवासापासून बिचारी तपकीर दूरावली. जेवणानंतर खुर्चीवर बसून पाय हलवीत अडकित्त्यानें सुपारीचीं खांडें करण्याचा आवडता व्यासंग. माझी मुलगी चि. शैला आजोबाची नक्कल हुबेहूब करुन आमची करमणूक करायची. टिळकपंथी अडकित्ता आतां नाहींसा झाला आहे, फक्त मोजकीं सुपारीचीं खांडें तेवढीं शिल्लक आहेत.

आर्थिक बाबतींत ते मला नेहमीं व्यवहारशून्य समजतात व मी त्यांना व्यवहारशून्य म्हणत असे. हेवा वाटण्यासारखी संपत्ति काकांनीं मागें ठेविली पण ती थोड्याच काळात सार्वजनिक कार्यांत घालविली. वकील झाले पण सनदेकरितो म्हणून अवघा एक खटला विनामूल्य लढविला. बिल्डिंग कॉंट्रॅक्टर झाले पण सार्वजनिक जीवनातील तत्त्वें धंद्याच्या व्यवहारांत लावण्याच्या प्रयत्नांत जें व्हायचें तेंच झालें. धंद्याची प्रगती यथातथाच. तुरुंगांतून आल्यानंतर मात्र कांहींसा फरक पडला पण तोहि विशेष नाहीं. घरची आर्थिक परिस्थिती साधारणच असतांना त्यांनीं तुरुंगांत प्रवेश केला. त्यांचे चुलतभाऊ कै. राजन्ना शिलम यांची कमाईहि साधारण. अशा परिस्थितींत नेहमींच ओढाताण असायची. कै. राजन्ना हे चुलतबंधू, पण दोघांचें एकमेकांवर निस्सीम प्रेम. तुलनाच करावयाची झाली तर रामलक्ष्मणाचीच करावी लागेल. तुरुंगवासांतील एक प्रसंग आठवतो मला. त्यांच्या मुलीच्या शिक्षणासाठीं शिष्यवृत्ती घ्यावी असें एका निकटच्या जबाबदार नातेवाईकानें आपुलकीनें मला सुचविलें. मी ती सूचना अमान्य केल्यामुळें त्यांनीं प्रत्यक्ष शिलमांनाच तसें सुचविलें. त्या बाबतीत येरवडा तुरुंगांतून दि. २०-१०-४३ रोजीं आलेल्या पत्रात त्यांनीं लिहिलें आहे—

"श्री......यांनें एक पत्र मला मिळालें. त्यात त्यांनीं चि. रतन हीस......... फंडांतून स्कॉलरशिप देवविण्यासंबंधीं लिहिलें आहे. आपल्या समाजांत आपल्यापेक्षाहि वाईट परिस्थितींत असलेले कितीतरी इतर योग्य असे विद्यार्थी आहेत. त्यांना सोडून आपण ही स्कॉलरशिप घेणें मला योग्य वाटत नाहीं. त्याप्रमाणें त्यांना कळवावें. सोबतचा लिहिलेला मजकूर त्यांकडे पाठविणें."

सार्वजनिक जीवनांत ही पथ्यें पाळणारी माणसें विरळाच नव्हे का ?

संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीच्या काळांत श्री. सिदम कॉंग्रेसतर्फे, समितीचे श्री. दोंदे यांच्याविरुद्ध विधानसभेच्या निवडणुकीस उभे राहिले. त्या निवडणुकीचा येथें उल्लेख करावासा वाटतो. दोघेहि तुल्यबळ उमेदवार. समितीच्या प्रचाराची लाट जोराची आणि प्रबळ. मतमोजणीच्या वेळीं समितीचा बालेकिल्ला समजल्या जाणाऱ्या वस्तींतील पेट्या उघडल्या गेल्या. त्यांतच सिदमांना मताधिक्य मिळालेलें पाहून आनंदाश्रयांचा व समितीला सखेदाश्चर्याचा धक्का बसला. सिदमांना मिळालेलीं हीं मतें मी लाख मोलाचीं समजतों. हीं मतें त्यांच्या निःस्पृह अविरत समाजकार्याला, त्यांच्या मनुष्यसंग्रहाला आणि त्यांच्या परमतसहिष्णुतेला जनताजनार्दनानें दिलेला कौल समजतों मी. कार्यरत प्रेम प्रतिस्पर्ध्याला जिंकू शकतें हेंच खरें. ज्या व्यक्तीला मी गुरु मानून अनुसरिलें परकरलें त्या ध्येयमूर्तीचें हें मोझें ओझरतें घांवतें दर्शन आहे. ते सभापति झाल्यापासून आम्हीं बरेंच दूरावलों, पण त्यांचा असाच उत्तरोत्तर उत्कर्ष व्हावा, राज्यपाल म्हणून नव्हे तर लोकसभेच्या कक्षेत, हीच माझी सदिच्छा. त्यांच्या संघटनाकौशल्याची व विधायक कार्याची मुंबईच्या जनतेला पूर्ण जाणीव आहे. अशा या विधायक कार्यकर्त्याचें व कुशल नेत्याचें मार्गदर्शन आम्हांस अनेक वर्षे लाभो हीच प्रार्थना.



# बलोपासनेच्या क्षेत्रांतील सिलम यांचें कार्य

लेखक : श्री. त्र्यंबक बाळकृष्ण कुळकर्णी मास्तर,
संस्थापक : शहर तालीम संघ, सोलापूर.

व्यक्तीचें महात्म्य हें तिच्या कार्यकर्तृत्वानें वाढत जाऊन ती व्यक्ति आदरणीय व मार्गदर्शक म्हणून सदैव आपणांपुढें उभी असते. असें हें वैभवाचें व्यक्तिमहात्म्य सर्वांना लाभूं शकत नाहीं. पण आम्हांला येथें प्रामुख्यानें व मोठ्या आनंदानें सांगावेंसें वाटतें कीं, श्री. सयाजीराव सिलम यांच्या गौरवार्थ हा जो ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा प्रयत्न केला गेला त्याचें कारण तरी हेंच आहे. श्री. सयाजीराव सिलम यांच्या अंगीं अनेकविध सद्गुणांचा व सत्कार्यांचा जो समन्वय आहे त्यामुळेंच ही गौरव ग्रंथाची प्रेरणा निर्माण होऊं शकली, हें प्रथमदर्शनीच खुल्या मनानें सांगून टाकावेंसें वाटतें. आणि म्हणून त्यांच्या अंगीं वसत असलेल्या अनेक गुणांचें मनोहारी रूप यांत आपणास दिसणार आहे. याबद्दल या कार्याचे प्रेरक नि सहकारी यांचें आम्ही अभिनंदन करतों.

श्री. सयाजीराव सिलम यांच्या कार्याची विविधता अलौकिक नि उत्साहवर्धक आहे. मुंबई व महाराष्ट्र विधान सभेतील सभासद म्हणून केलेलें कार्य, स्पीकर म्हणून निःस्पृहपणें बजाविलेली थोर कार्यपरंपरा, नगरपालिका, मजूर संघटना, मागासलेला समाज यासाठीं केलेली प्रयत्नांची पराकाष्ठा, शिक्षण, साक्षरताप्रसार, बँकेबद्दलची ध्येयनिष्ठा आणि कलाक्षेत्रांतील त्यांचे अतुलनीय श्रम अशा कितीतरी कार्याबाबतींत त्यांच्याबद्दल मुक्तक नि मनमोकळेपणानें लिहितां येईल. पण आम्हांला त्यांच्या एका परमप्रिय अशा कार्याच्या निमित्तानें जडलेल्या निकटच्या स्नेहसंबंधामुळें त्यांच्या कार्यतत्परतेची व लोकहितासाठीं सतत परिश्रम घेण्याची उत्कंठा किती प्रबळ आहे त्याची प्रचीति झाली.

सोलापुरास शहर तालीम संघ ही संस्था दि. ४-२-१९२९ रोजीं स्थापन झाली. कुस्तीवीरांना व व्यायामकल्ला प्रोत्साहन देण्याचें कार्य या संघामार्फत चालू आहे. स्वराज्यप्राप्तीनंतर कुस्त्यांच्या आखाड्याकरितां जागा मिळविण्यासाठीं १९४८ मध्यें आम्हीं मुंबई सरकारकडे अर्ज केला. पण जागा देतां येत नाहीं, असें १९५३ च्या मध्यास उत्तर आलें पुढें ऑक्टोबर १९५३ मध्यें अखिल महाराष्ट्र कुस्तीगीर परिषदेची स्थापना झाली. त्या परिषदकार्यांत श्री. सिलमसाहेबांचा घनिष्ठ संबंध असल्यामुळें त्यांचा परिचय झाला. तेव्हां आम्हीं आमच्या आखाड्याच्या जागेबाबतची झालेली कुचंबणा त्यांना समग्र निवेदन केली. त्यावर त्यांनीं असा दिलासा दिला " मी सोलापुरास आलों म्हणजे आपल्या संघाचें कार्य-दप्तर पाहीन. " या त्यांच्या आश्वासनाप्रमाणें ते सोलापुरास

आले व त्यांनीं संघाच्या कार्यालयास भेट देऊन चार पांच तास वेळ खर्चून सर्वच कार्यांची तपासणी केली व संतोष व्यक्त केला. आणि त्यानंतर त्यांनीं आम्हांस मुंबईस बोलावून त्या वेळचे महसूल मंत्री कै. भाऊसाहेब हिरे यांचेकडे नेऊन सर्व वस्तुस्थिति त्यांचेपुढें मांडली व आखाड्याकरितां संघास जागा देणें किती आवश्यक व उपयुक्त आहे याची कल्पना करून दिली. श्री. सिलमसाहेबांच्या या प्रयत्नामुळें या कार्यास चालना मिळून दि. ४ मे १९५४ रोजीं सरकारनें सोलापूरच्या संदर्भातील ४३६३७ चौ. फूट जागा दिली. श्री. सयाजीराव सिलम यांच्या या अमूल्य कार्याचा आम्हीं कृतज्ञतापूर्वक उल्लेख या निमित्तानें करतों. श्री. सिलमसाहेबांच्या कुस्तीगीरांच्या उत्कर्षासाठीं सतत प्रयत्न असतो. त्यांच्या मार्गदर्शनानें व प्रोत्साहनानें महाराष्ट्रांत तरी पहेलवानी पेशाकरितां सरकारकडून सक्रीय सहकार्य मिळूं लागलें, हें मोठ्या आनंदानें व अभिमानानें सांगूं इच्छितो.

आखाड्याकरितां जागा मिळाल्यानंतर त्या जागेत आखाडा इमारतीचा पायाभरणी समारंभ दि. १८-२-१९५७ रोजीं महाराष्ट्राचे त्या वेळचे गव्हर्नर ना. श्रीप्रकाश यांचे शुभ-हस्तें झाला. या कार्यासाठींदेखील श्री. सयाजीराव सिलम यांचेच परिश्रम कारणीभूत आहेत. त्यांच्याच कृपाप्रसादानें हा समारंभ अगदीं वैभवानें पार पडला. ही त्यांची कार्य-निष्ठा आमच्या तालीम संघाच्या इतिहासांत चिरस्मरणीय राहीलच पण पहेलवानी पेशांतील व व्यायामकलाक्षेत्रांतील त्यांच्या कार्याचें महाराष्ट्रांतील जनतेलाच काय पण आपल्या भारतांतील पहेलवानी पेशांतील व व्यायामप्रेमी मंडळींना कधींहि विस्मरण होणार नाहीं, इतकें तें वैभवसंपन्न व स्फूर्तिशाली आहे.

कार्याची दिशा नि प्रयत्न हा जसा त्यांचा अमोलिक गुण आहे तसाच लोकसंग्रह करण्याचा त्यांचा स्वभावहि अतिमोलाचा आहे. हातीं घेतलेल्या कार्याबद्दल आस्था नि तळमळ, बाणेदारपणा नि मायाळूपणा, प्रसंगावधान नि निर्भीडपणा, सत्यवचनी नि निगर्वी-पणा अशा अनेकविध गुणसमुच्चयामुळें त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचें महात्म्य सर्वत्र पूजनीय नि वंदनीय असें झालेलें आहे. १९५३ सालअखेर श्री. सिलमसाहेब सोलापूरास आले, त्या वेळचा त्यांचा जाहीर सत्कारसमारंभ फारच भव्य नि थाटाचा झाला. त्याची स्मृति सोलापूरकराना अद्यापि ताजी आहे. हा त्यांचा गुणगौरवच होय. श्री. सिलम-साहेब यांच्या प्रयत्नानें मिळालेल्या जागेंत बांधलेल्या आखाड्याचा नामकरणविधि समारं-भहि दि. १५-१-१९६२ रोजीं श्री. सिलमसाहेबांच्या शुभहस्तें झाला. हा "श्रीसिद्धेश्वर आखाडा" सोलापूरच्या वैभवांत अधिक भर टाकून जणूं श्री. सयाजीराव सिलम यांच्या रूपानें जनताजनार्दनापुढें उभा राहिला, असें मोठ्या प्रेमानें नि आनंदानें याप्रसंगीं म्हणावेसें वाटतें. अशा या कर्तृत्वशाली महापुरुषास उदंड आयुष्य लाभो नि त्यांचा सदैव उत्कर्ष होत राहो, अशी त्या श्री जगन्नियंत्याजवळ आमची प्रार्थना आहे.



# आदर्श समाजसेवक सयाजीराव सिलम

लेखक
श्री. बाबूराव न. जक्कल,
संपादक : सोलापूर समाचार, सोलापूर

महाराष्ट्र राज्याचे माजी सभापति श्री. सयाजीराव सिलम यांच्या ७० व्या वाढदिवसानिमित्त त्यांच्या दीर्घ सेवेबद्दलचा 'अभिनंदन ग्रंथ' प्रसिद्ध केला जात आहे, ही अत्यंत प्रसंगोचित व समाधानाची घटना होय. त्यांच्या आप्तवर्गांपैकीं मी एक असल्यामुळें या ग्रंथांत माझे विचार मांडावे किंवा कसें याबद्दल थोडीशी साशंकता वाटत होती. परंतु मुंबई शहराबाहेरसुद्धां अनेक महत्त्वाच्या सामाजिक संस्थांना व व्यक्तींना त्यांचें यथोचित मार्गदर्शन होत असे, याबद्दलची माहिती कदाचित् या ग्रंथांत प्रसिद्ध होण्याचें चुकून राहील याचाठींच हा लेख लिहिण्याचें धाडस केलें आहे.

सोलापूर शहरासारख्या दूरच्या ठिकाणीं मी राहात असल्यामुळें त्यांचा सततचा निकट संबंध आला नसला, तरी त्यांनीं वकिलीची पदवी मिळविल्यापासून त्यांचा माझ्याबरोबर अनेक कारणामुळें संबंध आला. त्या काळांत वकील या नात्यानेंच त्यांनीं कार्य करण्यास सुरवात केली असती तर आज ते मुंबईचे एक ख्यातनाम कायदातज्ज्ञ बनले असते आणि आर्थिक दृष्टीनें तर त्यांची फारच मोठी प्रगति झाली असती. परंतु सुरवातीपासूनच नोकरी अगर इतर पेशांत अडकून न पडतां समाजसेवा करण्यांतच आपलें आयुष्य घालविण्याची त्यांची वृत्ति असल्यामुळें, त्यांनीं वकिलीचा व्यवसाय कधींच केला नाहीं. तेलगू समाजासारख्या मागासलेल्या समाजांत त्यांचा जन्म झाला असल्यामुळें शिक्षणक्रम पूर्ण झाल्याबरोबर समाजसेवेची एकामागून एक महत्त्वाचीं कामें त्यांच्या अंगावर येऊन पडलीं व अशी सेवा करण्यांतच त्यांचें आजपर्यंतचें आयुष्य गेलें. सुरवातीस तेलगू समाजाच्या अनेक कार्यांत त्यांनीं हिरीरीनें भाग घेतला. आपल्या समाजांतील एक तरुण कार्यकर्ता तळमळीनें हें कार्य करूं लागला म्हणून समाजांतील वृद्ध पुढाऱ्यांनीसुद्धां त्यांना भरपूर उत्तेजन दिलें. यामुळें तरुण वयांत त्यांना मोठ्या व जबाबदारीच्या सेवाकार्यांचा चांगला अनुभव आला.

विशेष गाजावाजा न करतां प्रत्येक कामांत मागें राहून अशा कार्याची पद्धतशीर आखणी करण्याची त्यांची कार्यकुशलता आजपर्यंतसुद्धां अनेक योजनांत दिसून येते अशा तऱ्हेनें संघटनाचातुर्य असल्यामुळें मुंबईसारख्या पुढारलेल्या शहरांत, फारच थोड्या काळांत, त्यांची प्रमुख पुढाऱ्यांमध्यें गणना होऊं लागली. तेलगू भाषा बोलणाऱ्यांचे ते एक

नेते बनल्यामुळें, तरुण वयांतच मुंबई कॉर्पोरेशनमध्यें सभासद म्हणून निवडून येण्याची त्यांना संधि लाभली. मुंबई कॉर्पोरेशनच्या या कामामध्येंसुद्धां त्यांना सार्वजनिक कार्याचे चांगले घडे मिळाले.

याप्रमाणेंच सुरुवातीपासून त्यांची राष्ट्रीय वृत्ति प्रत्येक कामांत दिसत असल्यामुळें काँग्रेसच्या कार्यांत हळुहळूं त्यांना एकापेक्षां एक उच्च पदें मिळूं लागलीं. शेवटीं नामदार स. का. पाटील ह्यांच्या नेतृत्वाखाली मुंबई प्रदेश काँग्रेस कमिटीचे जनरल सेक्रेटरी या नात्यानें त्यांनीं फारच मरीब कार्य केलें. त्यांच्या राजकीय सेवेचा हा आढावा घेतांना चौपाटीच्या वाळवंटांत लोकमान्य टिळकांचा जो भव्य पुतळा दिसतो त्या कामीं त्यांनीं जें चिकाटीचें कार्य केलें त्याची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. लोकमान्यांचा पार्थिव देह चौपाटीवर दहन करण्याची परवानगी मिळणें ब्रिटिश राजवटींत अगदींच अशक्य होतें. याहि बाबतींत थोरामोठ्यांची मदत घेऊन, श्री. विल्स यांनीं यश मिळविलें व त्यानंतर त्याच ब्रिटिश राजवटींत त्या ठिकाणीं लोकमान्यांचा पुतळा उभारण्याचे कामांत तर त्यांनीं मिळविलेल्या यशावर कळस चढला. या त्यांच्या व्यवहारचातुर्याची व कर्तबगारीची केसरीसारख्या पत्रानें त्या काळांत मुक्त कंठानें स्तुति केली होती.

लोकमान्यांचा असा हा परमशिष्य त्यांच्या निधनानंतर महात्मा गांधींचाहि तितकाच कट्टर अनुयायी बनला. मुंबई शहरांत काँग्रेसचीं जीं एकापेक्षां एक लहानमोठीं अधिवेशनें गेल्या ३०–४० वर्षांत भरलीं व काँग्रेसचे जे इतर प्रचंड कार्यक्रम झाले, त्या सर्व कार्यांत श्री. विल्स यांच्यावर मोठमोठ्या जबाबदाऱ्या टाकल्या जात व ते सर्व कार्यक्रम रात्रींचा दिवस करून यशस्वी करण्याचें श्रेय त्यांना अनेक वेळां लाभलें आहे. अशा राजकीय कार्यांबरोबरच अनेक सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक, कामगार व मागासलेल्या समाजोन्नतिविषयक कामांतहि त्यांचा पुढाकार असे. इतक्या मोठ्या सार्वजनिक व्यापांतसुद्धां कलाशिक्षण कार्यांत त्यांनीं निरनिराळ्या संस्थांना जें उत्तेजन दिलें तें देखील कौतुकास्पद आहे. अखिल भारतीय कीर्तीच्या भारतसेवक समाजासारख्या संस्थेची मुंबई शहराच्या कार्याची जबाबदारी त्यांचेवरच सोंपविण्यांत आली होती. मुंबईतील दारूबंदी, समाजशिक्षण वगैरे यशस्वी आदर्श कायाच्या यशास तेच कारणीभूत झालेले आहेत. मुंबई शहरांतला कार्याचा एवढा मोठा व्याप असतांनासुद्धां पुणें, अहमदनगर, सोलापूर, हैद्राबाद वगैरे ठिकाणच्या अनेक संस्थांना व व्यक्तींना त्यांचें मार्गदर्शन आजहि लाभत आहे. पुणें येथील भारतीय व्यायामसारिणी या कलाशिक्षणाच्या संस्थेची आजची प्रगति त्यांच्या उत्तेजनामुळेंच दिसत आहे.

सोलापूर शहरांत सुमारें ७०–८० हजार तेलगू भाषा बोलणारे नागरिक आहेत. ज्या ज्या वेळीं त्यांचें सोलापुरात आगमन होतें त्या त्या वेळीं आपला एक थोर नेता व सल्लागार आपल्या शहरांत येत आहे असें या मंडळींना वाटत असतें. त्यामुळें ते आल्यापासून स्टेशनवर जाईतोंपर्यंत अनेक सार्वजनिक समारंभांना हजर रहून आपल्या बांधवांना ते

योग्य मार्गदर्शन करीत असतात. आपली भाषा तेलगू असली तरी महाराष्ट्र ही आपली मायभूमि व कर्मभूमि झालेली आहे म्हणून येथील जनतेशीं समरस होऊन आपली समाजसेवा करा असा हितकारक सल्ला अशा समारंभाच्या वेळीं ते देत असतात. यामुळेंच केवळ तेलगू भाविकच नव्हेत तर सोलापूर शहरांतील सर्व नागरिक त्यांच्या आगमनाचें सहर्ष स्वागत करतात. सोलापूरांतील सिटी तालीम संघाच्या भव्य श्रीसिद्धेश्वर आखाड्यासाठीं त्यांच्याच प्रयत्नानें जागा मिळाली. कामधेनूवाडीसारखी येथील गोरक्षणाची संस्था त्यांच्या मार्गदर्शनाचा नेहमीं फायदा घेते. येथील ज्योतिर्मंडळालासुद्धां त्यांचा सल्ला वेळोवेळीं मिळत असतो. असाच अनुभव मला अहमदनगर, हैद्राबाद, नागपूर वगैरे ठिकाणीं आलेला आहे. इतक्या विविध क्षेत्रांत काम करणाऱ्या कार्यकर्त्यांना ते देत असलेला अगदीं अचूक व व्यवहारी सल्ला ऐकून खरोखर आश्चर्य वाटतें.

त्यांचा रुबाबदार चेहेरा व अखंड काम करण्याची चिकाटी पाहिल्यानंतर ते ७० वर्षांचे झाले आहेत असें निकटवर्तीयांनासुद्धां वाटत नाहीं. यामुळेंच महाराष्ट्र राज्याच्या सभापतिपदावरून ते निवृत्त झालेले असले तरी आणखी अनेक वर्षें मुंबई शहराची व महाराष्ट्राची पूर्वीप्रमाणेंच त्यांच्या हातून भरीव सेवा घडेल याबद्दल खात्री वाटते.

परमेश्वर त्यांना दीर्घायुष्य देवो अशी प्रार्थना करून हा लेख संपवितो.



# सिलम यांचें पुणें–लोणावळा येथील शैक्षणिक कार्य

लेखक
श्री. य. न. कुळकर्णी,
प्रमुख : भारत हायस्कूल व कार्यवाह, विद्या प्रसारिणी सभा, पुणें-२.

माननीय श्री. सयाजीराव सिलम यांनीं गेलीं सुमारें चाळीस वर्षें अनेक प्रकारचें सार्वजनिक काम केलें. त्यांच्या कार्याचें मूल्यमापन करणारे लेख व आठवणी यांचा ग्रंथ श्री. सिलमसाहेबांना त्यांच्या सत्तराव्या वाढदिवशीं अर्पण करण्याचें अभिनंदन ग्रंथ समितीनें ठरविलें आहे. तें सर्वथा समुचितच आहे. या ग्रंथासाठीं मला लेख लिहिण्याची समितीनें संधी दिली याबद्दल मी तिचा ऋणी आहे.

सुमारें बारा वर्षांपूर्वी माझा सिलमसाहेबांशीं परिचय झाला. त्यानंतरच्या काळांत त्यांचें चरित्र मला फार जवळून न्याहाळतां आलें. एखादा गोड पदार्थ आपण चघळूं लागलों असतां त्याची गोडी उत्तरोत्तर वाढत जाते त्याप्रमाणें सिलमसाहेबांची कार्य-कुशलता, स्वभावाचा गोडवा, कामाचा व्याप व त्यांच्या अंगीं असलेले पुढारीपणाचे गुण यांसंबंधीं माझा आदर वृद्धिंगत होत गेला. लेख लिहावयास बसलों असतां अनेक घडामोडी डोळ्यांपुढें तरळतात. पण त्या सर्वांचा समावेश एकाच लेखांत करणें शक्यहि नाहीं व इष्टहि नाहीं. म्हणून आमच्या संस्था–भारतीय कलाप्रसारिणी सभा व विद्याप्रसारिणी सभा यांबाबत त्यांनीं जी कामगिरी केली तिच्यापुरतेंच लेखाचें स्वरूप मर्यादित करीत आहे.

श्री. सयाजीरावांचा व माझा साक्षात् संबंध १९५१–५२ मध्यें आला. श्री. नारायण-राव पुरम हे पुण्यांतील एक थोर व प्रसिद्ध चित्रकार होते. चित्रकलेचें शिक्षण देणारी जे. जे. स्कूल ऑफ आर्टसारखी एक संस्था पुण्यांत असावी अशी नारायण-रावांची फार इच्छा होती. १९६४ मध्यें त्यांनीं 'इन्स्टिट्यूशन ऑफ् मॉडर्न आर्ट' नांवाची संस्था सुरू केली. सध्यांचे महाराष्ट्र राज्याचे ड्रॉइंग ॲण्ड क्राफ्ट इन्स्पेक्टर श्री. व्ही. के. पाटील हे त्यांचे सहकारी होते. ही संस्था कशीबशी चालली होती. परंतु कांहीं अंतर्गत घडामोडींमुळें तिला चांगलें वाळसें येत नव्हतें. शेवटीं १९५१ मध्यें श्री. पाटील यांनीं मी, श्री. बाबूराव जगताप व प्रा. बी. व्ही. काळे यांची एक समिति नेमून ही संस्था तिच्या ताब्यांत दिली. पुण्यासारख्या ठिकाणीं अशी संस्था असणें आवश्यक आहे असें मला वाटत असल्यानें मी संस्थेच्या कामांत अधिक लक्ष घालूं लागलों. सहा वर्षें मी कार्याध्यक्ष म्हणून काम केलें. सध्यां मी एक कार्यकारी मंडळाचा सभासद आहे. कार्याध्यक्ष झाल्यावर मला असें वाटलें कीं, संस्था ऊर्जितावस्थेस आणावयाची म्हणजे कोणातरी मोठ्या

मार्गदर्शनाचा आधार व मार्गदर्शन हीं हवीत. आमच्यापुढें सहज सयाजीरावांचें नांव आलें. मी व श्री. पुरम त्यांना भेटावयास गेलों. त्यांनीं संस्थेची सर्व माहिती विचारली, आमच्या कल्पनेचें स्वागत केलें व आम्हांला सहाय्य करण्याचें आश्वासन दिलें. १९५१ ते ५२ पर्यंत सुरुवातीपासून वर्षभर आमची नियुक्त केलेली समितीच तात्पुरता कारभार पहात होती. पण १९५२ मध्यें रीतसर "भारतीय कला प्रसारिणी सभा" या संस्थेची स्थापना झाली व सिलमसाहेबांनीं तिचें अध्यक्षपद स्वीकारलें. तेव्हांपासून तेच संस्थेचे अध्यक्ष आहेत. कलाप्रसारिणी सभा म्हणजे पुण्यांतील त्यांचें स्मारकच होय. परिस्थिति प्रतिकूल असतां सर्व अडचणींचें निराकरण करून सिलमसाहेबांनींच संस्थेचें तारूं कुशलपणें हांकारलें. त्यांच्या कर्तृत्वाचें दृश्य फळ म्हणजे आजकलाप्रसारिणी सभेची स्वतःची इमारत पुरी होत आली असून लवकरच सभेचा पसारा तेथें जाईल.

सयाजीरावांच्या या कार्याचा मार्ग सुलभ नव्हता, त्यांना विरोध फार झाला. कित्येक वेळां अपमानाचे प्रसंग आले. आजीव सेवकांत मतभेद व फाटाफूट. यामुळें दुसऱ्या गृहस्थास काम करणें कठीण गेलें असतें. परंतु सयाजीरावांनीं आपल्या शांत व धिम्या स्वभावामुळें सर्व अडचणींचा निरास केला. संस्थेचें भलें व्हावें यासाठीं आपला वैयक्तिक अपमान झाला तरी त्याची त्यांनीं पर्वा केली नाहीं. या काळांत त्यांचे स्वभावविशेष मला प्रकर्षानें दिसून आले व कांहीं प्रसंग कायमचे लक्षांत राहिले आहेत. एकदां संस्थेच्या सेवकाची सभा भरली असतां सभेचें वातावरण फार तापलें. सयाजीरावांविरुद्ध काहूर उठणार व कदाचित् त्यांचा अपमान होणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. माझा जीव खाली-वर होऊं लागला. काम सुरळीत पार पडलें तर सर्वांच्या सहकार्यानें पार पडलें असें होतें, पण यदि कार्यविपत्तिः स्यान्मुखरस्तत्र हन्यते, याप्रमाणें अपयशाचा मोठा वांटा माझ्याकडे येणार असें मला वाटूं लागलें. पण सयाजीरावांच्या कौशल्यामुळेंच हा प्रसंग टळला. सभेस सुरवात होतांच त्यांनीं आपल्या असामान्य व्यक्तिमत्वामुळें व गोड भाषणामुळें सर्वांवर अशी कांहीं छाप पाडली कीं, विरोधकांचा विरोध कोठच्या कोठेंच मावळून गेला.

सिलमसाहेबांचा समाजशास्त्राचा अभ्यास फार खोल आहे. माणसाची चांगली पारख असल्यामुळें कोणाकडून काय काम करून घ्यावें हें ते अचूकपणें हेरतात. धडाडीपणा व दिलदारीपणा या गुणांचाहि प्रत्यय मला वेळोवेळीं आला.

कलाप्रसारिणी संस्थेचें कार्य करीत असतांना सिलमसाहेबांवर अपमानाचे अनेक प्रसंग आले, तरी त्यांनीं कधीं खंत केली नाहीं व असे प्रसंग निर्माण करणारांबद्दल कधीं मनांत अढी धरली नाहीं. उलट त्यांच्याशीं प्रेमळपणें वागून करतां येईल तेवढें त्यांचें हितच केलें ते स्वतः हलक्या कानाचे नाहींत. त्यामुळें कोणीहि कोणाहिविषयीं कांहीं येडेवांकडे सांगितलें तरी दुसरी बाजू ऐकल्याशिवाय व स्वतःची खात्री झाल्याशिवाय ते आपलें मत प्रदर्शित करीत नाहींत. दुसऱ्याला आपण केलेल्या चुकीबद्दल पश्चात्ताप झाला तर ते त्याचें

सर्व अपराध पोटांत घालतील व आपणावर संकट ओढवून घेऊन त्याचे होणारे लहतर परिणाम भोगण्यास तयार होतील. माणूस सरळ, सन्मार्गी, कार्यनिष्ठ व आत्मविश्वासू असला म्हणजे भरपूर विरोध असतांनासुद्धां, तो कसा यशस्वी होऊं शकतो, हें त्यांच्या उदाहरणावरून पटतें. सिलमसाहेबांसारखा नेता लाभल्यामुळेच कलाप्रसारिणी सभेची आज जी दिसते ती भरभराट झालेली आहे. तरीहि कलाप्रसारिणी सभेच्या आजीव सेवकांत मतभेद व फाटाफूट असल्यामुळें त्यांच्यासारखा थोर नेता लाभला असतानाहि, सभेला त्यांच्या व्यक्तिमत्वाचा पुरेपूर फायदा घेतां आला नाहीं, असें मला स्पष्टपणें म्हणावेसें वाटतें.

कलाप्रसारिणी सभेच्या संबंधामुळें सिलमसाहेबांचा विद्याप्रसारिणी सभेशीं संबंध आला. "विद्याप्रसारिणी सभा" पुण्यांत, 'भारत हायस्कूल' व 'भारत इंग्लीश स्कूल' अशा दोन माध्यमिक शाळा व तीन प्राथमिक शाळा चालविते. लोणावळ्यास सभेचीं दोन हायस्कुलें व प्राथमिक शाळा आहेत. विद्याप्रसारिणी सभेनें आतापर्यन्त अकरा लाख रुपये खर्च करून पुणें व लोणावळें येथे सर्व सोयींनीं सज्ज अशा इमारती बांधल्या आहेत. सर्व शाळा सिलमसाहेबांच्या परिचयाच्या असून सभेस त्यांचें मार्गदर्शन सदैव लाभत आहे. आमच्या सभेच्या प्रगतीस ऐन वेळीं जर सिलमसाहेबांची मदत झाली नसती तर आमच्या सभेचें लोणावळे येथील कार्य खुंटलें असतें.

पूर्वी लोणावळे म्युनिसिपालिटी स्वतःचें हायस्कूल चालवीत असे. १९३० साली स्वतः हायस्कूल न चालवितां दुसऱ्या एखाद्या शिक्षण संस्थेच्या ताब्यांत तें देण्याचा निर्णय म्युनिसिपालिटीनें घेतला. विद्याप्रसारिणी सभेनें तें हायस्कूल चालविण्यासाठीं घेतलें. त्यावेळीं करार असा ठरला कीं, म्युनिसिपालिटीनें जागा व इमारत सभेस वापरावयास द्यावी व भाड्यापोटीं जी रक्कम सभेनें म्युनिसिपालटीस द्यावयाची ती उलट म्युनिसिपालिटीनें शाळेस ग्रॅन्ट म्हणून द्यावी. पण हा करार दर तीन वर्षांनीं पुन्हां करावा लागे. युद्धकाळापर्यंत सर्व सुरळीत चालू होतें. पण त्यानंतर मुलांची संख्या झपाट्यानें वाढू लागली. शाळेची इमारत अपुरी पडून नवी इमारत बांधणें आवश्यक वाटूं लागलें. पण इमारत बांधण्याच्या कामी मोठा अडथळा होता. म्युनिसिपालिटीशीं दर तीन वर्षांनीं नवीन करार करावा लागे. यामुळें पक्की इमारत बांधावी कशी ? पुन्हा तीन वर्षांनी जागा सभेकडे राहीलच असें कोणी सांगावें ? शिवाय म्युनिसिपालिटींत पक्षीय राजकारण चालतें. त्याचे रंग कसे पालटतील तें कोणी सांगावें ? या सर्व अडचणींवर एकच तोडगा व तो म्हणजे दीर्घ मुदतीच्या पट्ट्यानें सभेच्या ताब्यांत जागा असणें.

१९५६-५७ साली सरकारनें म्युनिसिपालिटी बरखास्त करून प्रशासकाकडे कारभार सोपविला, त्यावेळी विद्याप्रसारिणी सभेनें सरकारपुढें आपली अडचण मांडून शाळेची जागा साठ वर्षांच्या करारानें सभेस द्यावी अशी सरकारला विनंति केली. त्याप्रमाणें सरकारी ठरावहि झाला. फक्त त्याची अंमलबजावणी व्हायची राहिली होती. इतक्यांत १४ नोव्हेंबर

१९५८ रोजीं म्युनिसिपालिटीची निवडणूक होण्याचें ठरलें आणि करारी कोण जाणे पण कांहींतरी चक्र फिरली आणि ४ नोव्हेंबर रोजींच आम्हांस पत्र आलें कीं, "६० वर्षांचा करार होणार नाहीं. सेक्रेटरिएटमधून स्टे ऑर्डर आली आहे. निवडणुका झाल्यानंतर तुम्ही करार करा." मागना तीस वर्षांचा आम्हांस म्युनिसिपालिटीचा अनुभव होता. तेव्हां निवडणूक झाल्यानंतर असा करार होणें अशक्य होतें, हें आम्हांस कळून चुकलेंच होतें. त्यामुळें आम्ही निराश झालों. त्वरेनें कांहींतरी उपाय करावयास हवा होता. तेव्हां मी व लोणावळा हायस्कूलचे सुपरिंटेंडेंट व माझे सहकारी श्री. द. आ. कुलकर्णी असे सिलम-साहेबांना भेटावयास गेलों. त्यांना सर्व परिस्थिति समजावून सांगून न्याय मिळवून देण्याची प्रार्थना केली. आम्हीं इतका उशीर केल्याबद्दल प्रथम त्यांनीं आम्हांस दोष दिला. परंतु सभेवर खरोखरच अन्याय होत आहे असें पाहून त्यांच त्यांनीं खटपट सुरू केली. तीत यश येऊन स्टे ऑर्डर रद्द झाली व निवडणूक होणाऱ्या दोन दिवसच आधी वरील करार झाला. आता दीर्घ मुदतीनें ताब्यांत आल्यामुळें सभेनें आज तेथें एक लक्ष रुपये खर्च करून इमारत बांधली आहे. या ऐन वेळी आलेल्या विघ्नाचा परिहार सिलमसाहेबांच्या सहाय्यावांचून झाला नसता, याची सभेत जाणीव आहे व त्याबद्दल सभा त्यांची सदैव ऋणी राहील. सभेच्या विद्यालयाच्या अनेक समारंभप्रसंगीं आपलेपणानें अध्यक्षस्थान स्वीकारून वेळोवेळीं त्यांनीं आम्हांस सल्लामसलत दिलेली आहे. त्यांची अशीच सभेवर कृपादृष्टि रहावी आणि त्याचें मार्गदर्शन आम्हांला लाभो, अशी आम्ही इच्छा करतों.

वरील सर्व प्रसंगांवरून त्यांच्या स्वभावाविषयीं माझ्या मनावर ठसा उमटला तो असा कीं, प्रथम दर्शनीं त्यांची मुद्रा करारी दिसते व ते फार मितभाषी आहेत. त्यामुळें त्यांच्याकडे जाण्यास भीति वाटते. पण सहवास घडल्यानंतर त्यांच्या प्रेमळपणाचा प्रत्यय येतो. त्यांच्याजवळ लहानथोर, अधिकारी–सामान्य माणूस गरीब–श्रीमंत, सुशिक्षित–अशिक्षित, असा भेद नाहीं. सर्वांना ते सारख्याच आपुलकीनें वागवितात. एखाद्या कार्याचें महत्व पटलें म्हणजे सर्व सामर्थ्यांनिशी ते त्याच्या पाठीमागें लागतात आणि प्रसंग-विशेषीं आपला वैयक्तिक मान अपमानहि बाजूस सारतात.

वरील गुणामुळेंच महाराष्ट्र राज्य विधान सभेचे सभापति असतांना त्यांनी मोठा लौकिक मिळविला. सर्व पक्षीयांना त्यांची आठवण राहील, अशी त्यांची कारकीर्द पाहिली म्हणजे, हें भाग्य फार थोड्यांनाच मिळतें असें वाटतें.

मनुष्याला कौटुंबिक व सार्वजनिक जीवनांत यशस्वी व्हावयाचें असेल तर त्यानें "तोंड" सांभाळावयास हवें. तोंडानें अधिक खाल्लें तर आरोग्य बिघडतें व अधिक बोललें तर माणसें तुटतात. सिलमसाहेबांनीं ही जीवनाची गुरुकिल्ली ओळखली आहे. "आधीं केलें मग सांगितलें." सिलमसाहेबांनीं आदर्श जीवनक्रम आचरिलेला आहे व आतां त्यांना इतरांना उपदेश करण्याचा अधिकार प्राप्त झालेला आहे.

श्री. सिलम म्हणजे महाराष्ट्राचें एक रत्न आहे. १९५६ ते १९६२ पर्यंत त्यांनी विधान सभेचे सभापति म्हणून काम केलें. विधान सभेंत अनेक पक्षांचे, अनेक विचारसरणीचे सभासद असतात. तेथे वादविवाद होतात. उघड मुद्देसूद चर्चा होतात. प्रसंगी तीक्ष्ण वाग्बाणांचे प्रहारहि होतात. सभापतीला कोणत्याहि आहारीं न जातां समतोलपणें मनावर ताबा ठेवून काम करावें लागतें. प्रसंगविशेषी अधिकारारूढ पक्षालाहि समज द्यावी लागते. सिलमसाहेबांच्या कारकीर्दींत तर विधानसभेंत विरोधीपक्ष मोठा होता. त्यांना नाजूक परिस्थितीस तोंड द्यावयाचें होतें. सिलमसाहेबांनी फारच कौशल्यानें ही कामगिरी पार पाडली.

मनुष्याची एक दळदळीत कामगिरी डोळ्यांपुढें असली म्हणजे इतरत्र केलेल्या कामगिरीकडे कानाडोळा होण्याचा संभव असतो. सिलमसाहेबांची सभापति म्हणून झालेली कामगिरी एकदम डोळ्यांपुढें येणारी आहे. पण त्यांनी मुंबई महापालिकेंत व इतर औद्योगिक क्षेत्रांत पुष्कळ काम केलेलें आहे. अशा या महाराष्ट्राच्या रत्नाला दीर्घ आयुष्य लाभो आणि आमच्यासारख्या औद्योगिक क्षेत्रांत काम करणाऱ्यांना त्यांचें दीर्घकाळ सहाय्य आणि मार्गदर्शन लाभो, अशी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे.



# सयाजीराव सिलम की कर्मयोगी संयमानंद?

निवेदक : श्री. अनंत हरि गद्रे

## सयाजीरावांची अमर कामगिरी

श्रीमान् दे. भ. सयाजीराव सिलम यांनी केलेली इतर शंभर सत्कृत्यें जरी लोक विसरून गेले तरी जोपर्यंत मुंबईतील गिरगांव चौपाटीवर लोकमान्य बाळ गंगाधर टिळक यांचा तो भव्य, रुबाबदार, पाहणाऱ्याच्या अंतःकरणाचा वेध घेऊन तडक हृदयांत जाऊन स्थानापन्न होणारा, ताठ उभा असलेला पुतळा ऐटींत उभा करून सयाजीरावांनी अमर कर्तृत्व केलें आहे, असें मी निर्भीडपणे गर्जून सांगतों.

टिळकांचें सारें चरित्र अलौकिक! त्यांचें जीवन जसें अलौकिक तसें त्यांनें मरणहि अलौकिकच! त्यांचा १९२० सालांतील तो मृत्यु, त्यांची ती स्मशानयात्रा, त्यांच्या शवाला खांदा देणारे ते महात्मा गांधी प्रभृति, सर्व जातींचे, सर्व धर्मांचे आणि सर्व पक्षांचे भारतभरचे थोर थोर पुढारी, त्यांच्या दहनासाठीं योग्य जागा मिळावी म्हणून गव्हर्नरापर्यन्त वजन नेणारे ते योरांतले थोर नेते, चौपाटीवर प्रेत-दहनाला परवानगी मिळल्याची ती रोमहर्षक कथा आणि टिळकांच्या मृतात्म्याला अखेरचें वंदन करण्यासाठीं जमलेला तो अफाट जनसागर, या साऱ्या पुढे मागे चमत्कारांत जमा होणाऱ्या गोष्टींची आठवण तो पुतळा करून देतो! जसें टिळकांचें जीवन अलौकिक तसा त्यांचा मृत्यु अलौकिक! जशी ती चौपाटीची जागा अलौकिक तसा तो पुतळाहि अलौकिक आहे. मुंबइच्या परिसरांत शेंकडो पुतळे उभारले गेले, शेंकडों पुतळे उभारले जात आहेत व पुढेहि शेंकडो पुतळे उभारले जातील, पण टिळकांच्या पुतळ्याची सर त्यांना येणार नाहीं हें सत्य होय. यांत इतर पुतळ्यांचा कमीपणा दाखविण्याची इच्छा नाहीं, पण हें आवर्जून सांगावयाचें आहे कीं, स्थान, रुबाब, ठेवण, इत्यादि अनुषंगिक बाबतींत, "या सम हा" असा हा पुतळा आहे! हा पुतळा ज्यांच्या श्रमानें आणि कर्तृत्वानें उभारला गेला, त्यांत सयाजीरावांचा भाग सर्वांत मोठा आहे. हा पुतळा एकट्या सिलमसाहेबामुळें उभा राहिलेला नाहीं. त्यांना डॉ. गोपाळराव देशमुख, नामदार बाळासाहेब खेर, वगैरे अनेकांचें साह्य झालें, तरीहि मी कोणाचाहि अपमान न करता असें म्हणतों कीं, हा पुतळा सयाजीरावांमुळेंच उभारला गेला. वास्तव टिळकांची कामगिरी जशी अमर तशीच त्यांचा पुतळा उभा रहावा म्हणून जिवाचें ज्यांनीं रान केलें त्या सयाजीराव सिलमांची कामगिरीहि अमर आहे.

## नारायण मित्र मंडळ

मला सयाजीरावांच्या खऱ्या स्वभावाचें दर्शन खासदार नारायणराव काजरोळकर यांच्या मेडोज् स्ट्रीटवरील कार्यालयांत झालें. कित्येक वर्षे अशीं गेलीं कीं, रोज ना रोज दुपारीं दोन ते पांच वाजण्याच्या दरम्यान सयाजीराव तेथें हटकून भेटावयाचे. यावेळीं

नारायणरावांच्या मित्रांच्या खूप गप्पा चालावयाच्या. या गप्पाष्टकांत भाग घेणारे सर्व मतांचे लोक असावयाचे. पण सयाजीराव असले म्हणजे त्या गप्पांना कधीं भडक स्वरूप येत नसे. त्यांच्या व्यक्तिमत्वाचा वचक एवढा दांडगा कीं, सारे संयमानें बोलत! स्वतः सिलम मोजकें बोलत आणि एका टोंकाला जाऊन भडकत नसत. संयम हा त्यांचा बाणा, संयम हा त्यांचा स्वभाव. ते अतिरेकी बोललेले मला कधीं आठवत नाहीं. मोजकें व टांसून बोलणें त्यांना पसंत असे. ते बोलण्यांत किंवा वागण्यांत कधीं संयम सोडीत नाहीत. तात्यासाहेब केळकर जसे सुसंयमपणासाठी प्रसिद्ध होते तसेच सिलम हे संयमाविषयीं प्रसिद्ध आहेत. संयम हा त्यांच्या आचारविचारांचा स्थायी भाव होय, हें मला नारायण-मित्र-मंडळाच्या बैठकींत कळून आलें.

## हरिजन सेवक संघांत

मुंबईच्या हरिजन सेवक संघाचे ते मुख्य मार्गदर्शक आहेत. या संघाच्या अनेक बैठकींना हजर राहाण्याची संधी मला मिळालेली आहे. तेथील अनेक सभांवरील वादविवादांत त्यांचा संयमी बाणाच दिसून आला. सभेला सिलम असले म्हणजे वादाचें तारूं कधींहि भडकत नसे.

## सर्वत्र संयमी वागणूक

दारुबंदीच्या सभांतसुद्धां सिलम कधीं अतिरेकाचें बोलले नाहींत. सरदार हायस्कूलचे ते मुख्य मार्गदर्शक. तेथेंहि त्यांचा संयमी सल्ला मिळावयाचा! म्हणून म्हणतो कीं त्यांना, "कर्मयोगी संयमानंद" अशी पदवी देणें उचित होईल.

## त्यांची मदत कोणासहि मिळते

मी हिंदुमहासभेंत व सिलम कॉंग्रेसमध्यें. पण हा भेद त्यांच्या माझ्या स्नेहाच्या आड कधींच आला नाहीं. मी हिंदुमहासभेच्या सर्वमान्य विधायक कार्याला त्यांची मदत घेत असे. मला ते मदत करीत त्याचें लोकांना मोठें आश्चर्य वाटे! एकदां तर अशी गंमत झाली कीं, त्याना मी चहाच्या व्यापारांत एका गुजराती व्यापाऱ्याची मदत देण्याविषयीं गळ घातली. हा व्यापार गोरेगांवच्या "झुणका भाकर आश्रमा"च्या मदतीसाठीं करण्याचा माझा विचार होता. सयाजीरावांनी तात्काळ त्या व्यापाऱ्याला बंगल्यावर बोलावून घेतलें आणि त्यास मला मदत करावयास सांगितलें. पण पुढें अशी गंमत झाली कीं, माझी व्यापाराची कल्पनाच बारगळली व सारा खटाटोप चहाच्या पेल्यांत विरघळून गेला. मी कसला व्यापार करतों! माझा सारा 'अव्यापारेषु व्यापार' असतो.

## सिलमसाहेबांच्या स्वभावाचे पैलू

सयाजीराव सिलम नामदार सभापति झाले तेव्हां त्यांच्या स्वभावातील सारे पैलू लोकांच्या नजरेला पडले. त्यांत त्यांच्या संयमशील स्वभावानें विरोधकांनाहि जिंकलें हें सत्य कधींहि विसरलें जाणार नाहीं. म्हणून म्हणतों कीं, सायजीराव सिलम हे नुसतेच कर्मयोगी नाहींत तर "संयमानंद कर्मयोगी" आहेत.

अशा संयमी सिलमसाहेबांचा सदा उत्कर्षच होणार!

# सभापति सयाजीराव

( लेखक : श्री. नवनीतभाई बार्शीकर, बी. ए. अध्यक्ष, अहमदनगर शहर-पालिका व चेअरमन नगर डिस्ट्रिक्ट अर्बन सेण्ट्रल को-ऑपरेटिव्ह बँक लि. अहमदनगर )

गेल्या सुमारे पांच वर्षांहून अधिक काळपर्यंत आपल्या अलौकिक व्यक्तिमत्वानें व तेजस्वी वाणीनें महाराष्ट्र विधानसभेचें सभापतिपद भूषवून, विधानसभेची थोर परंपरा काटेकोरपणें पाळून ज्यांनीं एक आदर्श निर्माण केला, त्या आपल्या माननीय सयाजीरावांचा यथोचित सन्मान व अभिनंदन करून, त्यांना त्यांच्या वाढदिवसाच्या शुभ प्रसंगीं ग्रंथरूपानें आदरांजलि अर्पण करण्याचा संकल्प कार्यवाहीत आणण्याच्या कार्यास सुरुवात झाली असल्याबद्दल माझे मित्र नामदार डॉ. कैलास यांनीं मला जेव्हां कळविलें तेव्हां मला अत्यानंद झाला व हें कार्य हातीं घेतल्याबद्दल डॉ. कैलास व अभिनंदन ग्रंथसमितीचे इतर सदस्य यांना मनोमय धन्यवाद दिले.

आपल्या अद्वितीय व्यक्तिमत्वानें सभागृहावर विलक्षण छाप पाडणारे व अत्यंत सौजन्यशील स्वभावाचे असे हे श्री. सयाजीराव जेव्हां निवृत्त होऊन त्यांनीं सभापतिपदाचीं सूत्रें खालीं ठेवलीं, त्याच वेळीं सहजगत्या मनांत एक विचार चमकून गेला कीं, अशा या असामान्य कर्तृत्ववान व आदर्श सभापतींच्या जीवनकार्याचें ओझरतें दर्शन महाराष्ट्रीय जनतेस व्हावें या दृष्टीनें व त्याच्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करून आणि त्यांचें अभिनंदन करून, लहानशा ग्रंथरूपानें त्यांना आदरांजलि अर्पण केली, तर तें समयोचित होईल व त्यामुळें इतरानाहि मार्गदर्शन होईल. आणि योगायोग असा कीं, नेमकें हेंच कार्य हातीं घेतल्याबद्दल जेव्हां डॉ. कैलास यांचें पत्र माझे हातीं पडलें तेव्हां मला या विलक्षण योगायोगाचें फार आश्चर्य वाटलें व अत्यंत आनंद झाला. आणि म्हणून त्यांच्या गौरवपर दोन शब्द लिहितांना मला अत्यंत समाधान वाटत आहे. श्री. सयाजीरावांच्या मागें आज जवळ जवळ चाळीस वर्षांची तपःश्चर्या उभी आहे. या प्रदीर्घ काळांत त्यांनीं बहुमोल लोकसेवा करून महान् कार्य केलेलें आहे. जीवनाच्या जवळ जवळ सर्वच क्षेत्रांत त्यांनीं फार मोठें समाजकार्य केलेलें आहे. समाजांतील सर्व थरांतील हजारो लहान मोठ्या लोकांशीं त्यांचा अहर्निश संबंध येत असे व त्यावेळीं त्यांच्या सौजन्यपूर्ण स्वभावानें व मनमोकळ्या वागणुकीनें प्रत्येक जण भारावून जात असे. आमच्या नगरला अधिकृतरीत्या व खाजगीरीत्या त्यांनीं पुष्कळ वेळां भेटी दिल्या आहेत व आमच्या नगरपालिकेनें त्यांना मानपत्रहि अर्पण केलें आहे. गतवर्षी त्यांनीं नगरपालिकेला भेट दिली त्यावेळीं नगरपालिकेनें केलेलीं निरनिराळीं कार्यें पाहून व नगरपालिकेची होत असलेली प्रगती पाहून त्यांनीं अत्यंत समाधान व्यक्त केलें. त्यावेळीं नगरपालिकेच्या कांहीं अडीअडचणी होत्या त्याहि त्यांचेपुढें मांडल्या होत्या. त्यांवर सहानुभूतिपूर्वक विचार करण्याचें आश्वासन देऊन आम्हांस नगरपालिकेच्या प्रगतीचें कार्य असेंच नेटानें पुढें चालविण्याबद्दल उत्तेजन

दिलें होतें. नगरपालिकेच्या सर्वांगीण सुधारणेबद्दल त्यांना विशेष आस्था वाटते. नगरपालिकेनें शहराची सर्वांगीण सुधारणा जलद गतीनें करून आपापलें शहर आदर्श बनवावें व त्यांत नागरिकांनीहि स्वयंस्फूर्त सहकार्य द्यावें असें त्यांना मनापासून वाटतें व म्हणूनच आमच्या नगरपालिकेनें गेल्या पांच सहा वर्षांत अनेकविध कामें करून शहराची सर्वांगीण सुधारणा करण्याचा व कायापालट करण्याचा प्रयत्न चालविला आहे तो पाहून श्री. सयाजीरावांनीं प्रशंसोद्‌गार काढून उत्तेजन दिलें आहे.

श्री. सयाजीराव खऱ्या अर्थानें सभापति होते. त्यांचा दरारा व करडी शिस्त यामुळें सर्व सभागृहाला त्यांचा वचक असे. सभागृहाच्या बाहेरील जगांत ज्यांना त्यांचें जवळून दर्शन झालें त्यांनीं विधानसभेंत सभापतिपदावर आसनस्थ होऊन करड्या शिस्तींत चालविलेलें सभागृहाचें कामकाज पाहिलें तर त्यांना, हेच का ते सौजन्यमूर्ति सयाजीराव असा संभ्रम पडत असे. विधान सभेत कामकाज चालू असतांना उपस्थित रहाण्याचा मला प्रसंग आला होता. त्यांचे काळेभोर डोळे, करडी नजर, दमदार व्यक्तिमत्त्व, भिळदार मिशा, उंच-अंगयष्टी, स्पष्ट खणखणीत आवाज व गंभीर मुद्रा यामुळें सभापतींच्या खुर्चीवर ते खरोखरच शोभून दिसत. सभागृहांत त्यांचें आगमन होतांच सर्वत्र स्तब्धता पसरे. त्यांच्या पांच वर्षांच्या कारकीर्दींत सभागृहाची शिस्त, प्रतिष्ठा, गांभीर्य व परंपरा यांना त्यांनीं यत्किंचित्‌ हि कधींच धक्का लागूं दिला नाहीं व कोणत्याहि बाबतींत पक्षपातीपणा तर कधींच दाखविला नाहीं. उलट विरोधी पक्षाला जास्तींत जास्त सहकार्य देण्याकडे त्यांची प्रवृत्ति असे. कर्तव्याचें काटेकोरपणें पालन करीत असतांना कोणाहिबद्दल त्यांनीं कटु भावना बाळ-गली नाहीं, की जी व्यक्ति त्यांच्या सान्निध्यात आली ती ती त्यांची मित्रच झाली. सभा-गृहांत अनेकदां वादविवाद होऊन बिकट प्रसंग निर्माण झाले असतील, पण त्या प्रत्येक वेळीं खंबीरपणें त्यांनीं शिस्त पाळली. अशा प्रकारें विविध गुणांनीं मंडित असलेल्या श्री. सयाजीरावांचा आणखी एक गुणविशेष म्हणजे भाषाप्रभुत्व होय. इंग्रजी, मराठी, ऊर्दू, गुजराती, तेलगू वगैरे भाषांत ते अगदीं अस्खलितपणें बोलूं शकतात. शिवाय या भाषांचा व्यासंगहि फार दांडगा आहे. तीव्र स्मरणशक्ति हेंहि त्यांचें एक वैशिष्ट्य आहे. प्रखर देशभक्तीनें प्रेरित होऊन दीर्घकालापासून ते करीत असलेलें काँग्रेस संघटनेचें कार्य सर्वश्रुत आहेच. शिवाय यांचा साक्षरताप्रसार, वाङ्मय, ललितकला, मागासलेल्या समा-जाची उन्नति व मजूर वर्गांची संघटना आणि स्थानिक स्वराज्य संस्था, अशा अनेकविध क्षेत्रांत फार मोठी भरीव कामगिरी करून जनसेवा केलेली आहे व करीत आहेत. या क्षेत्रां-तील विविध संस्थांशीं त्यांचा घनिष्ठ संबंध असून त्याकरितां निरलसपणें व सतत काम करण्याची त्यांची हातोटी विलक्षण आहे. अशा या दीर्घ व्यासंगी व समाज-सेवक पुरुषाचें अभिनंदन करून हा छोटासा ग्रंथरूपानें त्यांना महाराष्ट्रीय जनता आदरांजलि अर्पण करीत आहे, ही गोष्ट अत्यंत स्तुत्य, समयोचित व भावनापूर्ण आहे. त्यांच्या ज्ञानाचा व अनुभवाचा फायदा पुढील पिढीस सतत मिळत राहो, एवढीच महाराष्ट्रीय जनतेची अपेक्षा आहे. त्यांच्या जीवनकार्याची अगदीं मोटक किंवा संक्षिप्त रूपरेखाच यावयाची झाली तर ती पुढीलप्रमाणें देतां येईल.

व्हाइस प्रेसिडेंट, मुंबई प्रदेश काँग्रेस कमिटी ( १९४१ )

जनरल सेक्रेटरी, मुंबई प्रदेश काँग्रेस कमिटी ( १९४६-१९४९ )

सेक्रेटरी, बॉम्बे हिंदी सभा.

अध्यक्ष, बॉम्बे ऑटोमोबाईल एम्प्लॉईज युनियन.

अध्यक्ष, बॉम्बे इन्श्युअरन्स एम्प्लॉईज युनियन.

चेअरमन, प्रोहिबिशन इनॉगरेशन सेलेब्रेशन कमिटी.

मेंबर, ग्रेटर बॉम्बे प्रोहिबिशन कमिटी.

मेंबर, सिटी अँण्ड सबर्बन पोस्ट वॉर डेव्हलपमेन्ट कमिटी व ह्या कमिटीच्या हाउसिंग प्लॅनचे चेअरमन.

१९४१ मध्ये वैयक्तिक सत्याग्रहाबद्दल एक वर्ष स्थानबद्ध व १९४२ च्या आंदोलनात दोन वर्षे येरवडा येथे स्थानबद्ध.

१९२२ ते १९४६ पर्यंत बॉम्बे म्युनिसिपल कॉर्पोरेशनचे सभासद व या मुदतीत चेअरमन स्टँडिंग कमिटी, चेअरमन बजर्स मार्केट्स् अँण्ड गार्डन्स कमिटी, मेंबर बॉम्बे इम्प्रूव्हमेन्ट ट्रस्ट कमिटी अँण्ड स्कूल कमिटी या नात्याने कामे केली.

मुंबई युनिव्हर्सिटीचे फेलो.

सभासद, बॅकवर्ड क्लास बोर्ड ऑफ बॉम्बे स्टेट.

मुंबई विधान सभेवर प्रथम १९४६ मध्ये निवडून आले.

सन १९३७-३८ च्या कॉंग्रेस मंत्रिमंडळाचे वेळी प्रोहिबिशन कमिशनर.

सेक्रेटरी, टिळक मेमोरियल कमिटी.

प्रेसिडेन्ट, सोसायटी ऑफ दि ऑनररी प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट्स.

नोव्हेंबर १९५६ मध्ये मुंबई विधान सभेचे स्पीकर म्हणून निवड होईपर्यंत मुंबई विधान सभा कॉंग्रेस पक्षाचे चीफ् व्हिप्.

१९५७ मध्ये मुंबई वाळकेश्वर मतदार संघातून मुंबई विधान सभेवर पुन्हां निवडून आले व स्पीकर म्हणून पुन्हां निवड झाली.

आयुष्यभर सामाजिक कार्यात मग्न व कित्येक शैक्षणिक संस्थांशी घनिष्ट संबंध.

यावरून वरीलप्रमाणे नुसती ओझरती रूपरेषा जरी पाहिली तरी श्री. सयाजीराव यांनी आजपर्यंत जीवनाच्या विविध क्षेत्रांत केवढी प्रचंड भरीव कामगिरी केली आहे व करीत आहेत याची कल्पना येईल. असो.

शेवटी ह्या अभिनंदन ग्रंथरूपाने माननीय सयाजीरावांना आदरांजलि अर्पण करण्याच्या शुभ प्रसंगी त्यांना दीर्घायुरारोग्य प्राप्त होवो व उत्तरोत्तर त्यांचे हातून अधिकाधिक समाजसेवा घडो, अशी प्रार्थना करून हा छोटासा लेख संपवितो.

---

# श्री. सयाजीराव सिलम यांचें विशाल नेतृत्व

लेखक
गं. का. गांवकर,
एम. ए., डिप्. एड्.
समाज शिक्षणाधिकारी, मुंबई.

सामाजिक आणि राजकीय क्षेत्रांतील कांहीं महत्त्वाच्या स्थानांवर गेल्यामुळें कांहीं व्यक्तींचें महात्म्य वाढल्याचें दिसून येतें, तर कांहीं स्थानांचें महात्म्य कांहीं प्रभावी व्यक्तींमुळें अधिक प्रभावी झाल्याचें दिसून येतें. श्री. सयाजीराव सिलम हे अशाच प्रभावी व्यक्तींपैकी आहेत कीं, ज्यांमुळें त्यांनीं भूषविलेलीं राजकीय व सामाजिक क्षेत्रांतील महत्त्वाचीं स्थानें अधिक प्रभावी झाल्याचें आपण पाहिलेलें आहे. आपल्या विशाल आणि बहुगुणी व्यक्तिमत्वाची छाप श्री. सिलम यांनीं मुंबईच्या राजकीय आणि सामाजिक क्षेत्रांत गेलीं कित्येक वर्षें पाडून ठेवलेली आहे. खास करून सामाजिक क्षेत्रांत वावरतांना त्यांनीं असे अनेक कार्यकर्ते तयार करून ठेवलेले आहेत कीं, आणखी अनेक वर्षें त्या कार्यकर्त्यांच्या स्वरूपांत श्री. सिलम यांचें प्रभावी व्यक्तिमत्व दिसून येत राहील.

मुंबईतील समाज शिक्षणाच्या क्षेत्रांत श्री. सिलम यांनीं सामान्य कार्यकर्त्यापासून तों समाज शिक्षण समितीचे अध्यक्ष या नात्यानें कार्य केलें आहे. मुंबईत समाज शिक्षणाची मोहीम १९३७ सालीं सुरू झाली. त्यावेळीं श्री. सिलम या क्षेत्रांतील संघटक म्हणून काम करीत होते. त्यानंतर त्यांचें राजकीय क्षेत्रांतील कार्य अधिक व्यापक झालें आणि त्यांना समाज शिक्षणाचें प्रत्यक्ष कार्य करणें अशक्य झालें. पुढें ते बाहेर राहून या कार्याला यथाशक्ति सहकार्य व सहानुभूति एवढेंच देऊं शकले. पुढें १९५४ मध्यें त्यांनीं पुन्हा समाज शिक्षणाच्या प्रत्यक्ष कार्यक्रमांत भाग घ्यायला सुरवात केली. १९५५–५६ च्या समाज शिक्षण समितीचे अध्यक्ष या नात्यानें त्यांनीं बहुमोल कार्य केलें.

१९५८ पासून ते मुंबई शहर समाज शिक्षण समितीचें अध्यक्ष झाले. त्यावेळेपासून तों आजमितिपर्यंतच्या काळांत त्यांनीं मुंबईतील समाज शिक्षण मोहिमेला आपल्या यशस्वी नेतृत्वाचा लाभ दिला. समाज शिक्षणाच्या अनेकविध कार्यक्रमांत श्री. सिलम यांच्या कुशल योजक बुद्धीची, नेतृत्वाची आणि कार्यांतील व्यावहारिक चातुर्याची छाप पडलेली कोणालाहि दिसून येईल. समितीच्या शासन व्यवस्थेचें विकेंद्रीकरण, कार्यांतील शिस्तबद्धपणा, बहुविधता आणि योजकता, दैनंदिन कारभारावर दक्षतायुक्त देखरेख आणि कार्यक्रमांतील चैतन्ययुक्त नवीनता या सर्व गोष्टींची अमोल देणगी श्री. सिलम यांनीं समाज शिक्षण समितीला देऊन ठेवली आहे. १९५८ सालीं मुंबई शहर समाज शिक्षण समितीचें धुरिणत्व स्वीकारल्यानंतर

श्री. सिडम यांनी करून घेतलेल्या ठळक गोष्टींची यादी फार मोठी होईल. परंतु त्यांतल्या कांहीं प्रमुख गोष्टी पुढीलप्रमाणे आहेत.

## बहुजन शिक्षणाचे कार्यक्रम

साक्षरता शिक्षण हा जरी आजच्या समाज शिक्षणकार्याचा गाभा असला तरी समाजाला त्या अर्थाने शिक्षित करण्यासाठीं बहुविध स्वरूपाचा सामाजिक कार्यक्रम आखणें आवश्यक वाटल्यावरून श्री. सिडम यांनी नवीन कार्यक्रमाची आंखणी करण्याचें आवाहन आपल्या सहकाऱ्यांना दिलें. बहुजन समाजाला यशस्वी सामाजिक व सांस्कृतिक जीवनाची शिकवण देण्यासाठीं अनेकविध कार्यक्रम आखण्यांत येत असत. परंतु हे कार्यक्रम मर्यादित स्वरूपाचे वाटल्यावरून श्री. सिडम यांनी सामुदायिक जाहीर भाषणांची एक योजना तयार करून घेतली. या कार्यक्रमांतून खास करून नागरिकत्वासारख्या महत्त्वाच्या विषयावर नामांकित व तज्ज्ञ व्यक्तींची जाहीर व्याख्यानें ठेवण्याची योजना त्यांनी सुरू केली. व्याख्यानमालेची सुरुवात करण्याची विनंती श्री. सिडम यांनी महाराष्ट्राचे भूतपूर्व राज्यपाल श्रीप्रकाश यांना केली. त्यांनी ही विनंती मान्य केली, एवढेंच नव्हे तर अशा प्रकारचीं तीन जाहीर व्याख्यानें श्रीप्रकाश यांनी स्वतः दिलीं. या व्याख्यानाद्वारें एका वेळीं अंदाजे पांच हजार लोकांना नागरिकत्वाचें शिक्षण देण्याची योजना यशस्वी झाली.

## मनरंजनांतून समाज शिक्षण

सामान्य नागरिकाची सांस्कृतिक व कलात्मक भूक भागविण्यासाठीं त्याला सात्त्विक मनरंजनाचे कार्यक्रम पुरविणें आवश्यक असतें. समाज शिक्षणाच्या योजनेप्रमाणें असे सात्त्विक मनरंजनाचे कार्यक्रम वारंवार घडवून आणण्यांत येत असतात. या कार्यक्रमांतून स्थानिक कलावंत आणि कलात्मक कार्यक्रम करणाऱ्या संस्था यांना प्रामुख्यानें स्थान देण्यांत येत असतें. परंतु असे रंजनात्मक कार्यक्रम नेहमींच योग्य प्रतीचे मिळतील अशी खात्री नाहीं. श्री. सिडम यांनी ही गरज ओळखून खास सांस्कृतिक कार्यक्रमांची एक योजना तयार करवून घेतली. या योजनेद्वारें महाराष्ट्रांतील नामवंत लोकगीत गायक व लोकनाट्यकारांना पाचारण करण्यांत आलें. महाराष्ट्रांतील दोन नामवंत कथाकारांनी नियमित कार्यक्रम करण्याचें आश्वासन दिलें. हे कार्यक्रम नियमित रीतीनें शहरांतील कामगार वस्तीच्या निरनिराळ्या भागांत ठेवण्यात येऊं लागले. दर महिन्याला अशा प्रकारचा एक कार्यक्रम ठेवण्यांत येऊं लागला. या आकर्षक लोकनाट्याच्या कार्यक्रमांना हजारों लोकांच्या उपस्थितीचा लाभ मिळूं लागला. या कार्यक्रमाला नामांकित व्यक्ती व पुढारी यांना प्रमुख म्हणून बोलाविण्यांत येऊं लागलें. अशा प्रमुख व्यक्तींच्या मुखाद्वारें समाजशिक्षणाचें महत्त्व पटवून देण्याचा उपक्रम सुरू करण्यांत आला. अशा लोकनाट्याच्या कार्यक्रमांतून खास समाजशिक्षण विषयावरील छोटे संवाद व गाणीं यांचीदेखील योजना केलेली असे. विविध स्वरूपाच्या कार्यक्रमांद्वारें लोकांचें सात्त्विक मनरंजन आणि त्याचबरोबर त्यांना नागरिकत्वाचें शिक्षण देणें या दोन्हीं गोष्टी साधतां येतात. 'एक पंथ दो काज' अशी या कार्यक्रमांत दुहेरी उपयुक्तता साधलेली आहे.

## नवसाक्षरांसाठी ‘साक्षरतादीप’ :

समितीच्या समाज शिक्षण वर्गांत साक्षर झालेल्या प्रौढांसाठी साक्षरोत्तर वाङ्मयाचा नियमित पुरवठा होणें आवश्यक असतें. आणि ही गरज भागविण्यासाठीं समितीनें अनेक पुरवणी पुस्तकें प्रसिद्ध केली आहेत. त्याचप्रमाणे नवसाक्षरांची नियमित वाचनाची गरज भागविण्यासाठीं “साक्षरता दीप” नांवाचें एक पाक्षिक समितिमार्फत प्रसिद्ध करण्यांत येई. या पाक्षिकांतून मनोरंजक माहिती, कथा-वाङ्मय आणि विविध सामाजिक विषयांवरील माहिती प्रसिद्ध करण्यात येते. ‘साक्षरता दीप’ अधिक आकर्षक कसा करतां येईल याचा श्री. सिलम हे सतत विचार करीत असायचे. शेवटीं त्यांनीं एक योजना समितीसमोर मांडून मंजूर करून घेतली. श्री. सिलम यांच्या योजनेप्रमाणें ‘साक्षरता दीप’ हें मासिक बनविण्यांत आलें, त्याचें पूर्वीचें अंतर्बाह्य स्वरूप बदलून तें अधिक आकर्षक करण्यांत आलें. बदललेल्या स्वरूपांतील ‘साक्षरता-दीप’ वाचकांचा अधिक आवडता झाला आहे.

## ‘समाज शिक्षण मंदिर’

श्री. सिलम यांनीं समाज शिक्षण समितीने अध्यक्ष या नात्यानें केलेल्या कामगिरीचें अत्युच्च शिखर म्हणजे आपल्या सहकाऱ्यांच्या सहाय्यानें उभें केलेलें समाज शिक्षण मंदिर हें होय. समाज शिक्षण समितीच्या कार्याचा व्याप दिवसेंदिवस वाढत चाललेला असून समितीला आपले विविध कार्यक्रम अबाधितपणें चालू ठेवण्यासाठीं स्वतःची जागा असावयास हवी ही गोष्ट ओळखून, श्री. सिलम यांनीं समाजशिक्षण मंदिराची योजना त्वरित हातीं घेण्याची समितीला आग्रहाची विनंती केली. हें मंदिर उभें करण्यासाठीं एक खास समिति नेमण्यांत आली. श्री. सिलम यांनीं जोरदार चालना देऊन, मंदिराच्या योजनेंतील महत्त्वाचा टप्पा पुरा केला. आजपर्यंत मंदिरासाठीं अंदाजें दोन लाख रुपयांचा निधि गोळा करण्यांत आला असून मंदिराच्या एका बाजूचे तळ व पहिला असे दोन मजले बांधून पुरे करण्यांत आले आहेत. समाज शिक्षण मंदिराची संपूर्ण योजना पुरी झाल्यावर त्या ठिकाणीं समितीची कचेरी, हस्तकला केंद्र, सहकारी दुकान, प्रशिक्षण केंद्र, सांस्कृतिक केंद्र, मातृविकास केंद्र, वाचनालय, प्रशस्त सभागृह व नाट्यगृह इत्यादि विविधस्वरूपी कार्यक्रमांना स्थान मिळणार आहे. विशेष महत्त्वाची गोष्ट म्हणजे समाज शिक्षण समितीला आपलें स्वतःचें ‘घरकुल’ त्या ठिकाणीं निर्माण करतां येणार आहे. आतापर्यंत गांठलेल्या मंदिर योजनेच्या पल्ल्यातील यशाचा विचार करतांना आतां व भावी काळांतदेखील समिति श्री. सिलम यांची अभिमानपूर्वक आठवण केल्यावांचून राहणार नाहीं.

समाजशिक्षण समितीच्या दैनंदिन कारभारांतील क्लिष्टपणा घालविण्यासाठीं त्यांनीं कारभारांतील कामें आपल्या अनुयायांत विभागून शासनकार्याचें विकेंद्रीकरण केलें. समितीच्या अधिकाऱ्यांत देखील निरनिराळ्या महत्त्वाच्या कामाची वाटणी करून अधिक जबाबदारी घेण्याचें त्यांना शिक्षण दिलें. एवढें करीत असतांना समितीच्या कार्यांतील प्रत्येक बाबीवर त्यांची स्वतःची नजर मात्र सतत असावयाची. समितीच्या महत्त्वाच्या कामांतील कागदपत्रांचा ते नीट अभ्यास करून स्पष्ट निर्णय द्यायचे. त्यांच्या

कारकीर्दीचा आणखी एक विशेष म्हणजे सभा-संचालन. श्री. सिलम हे समितीचे अध्यक्ष झाल्यापासून समितीच्या मासिक सभांची उपस्थिति वाढूं लागली. याचें कारण शोधायला गेल्यानंतर असें आढळून आलें कीं, श्री. सिलम हे सभेचें काम ठराविक वेळांत आटपून घेतात. सभेतील कामकाजावर ते स्वतः भरपूर विचार करूनच सभेंत यायचे आणि त्यामुळें प्रत्येक गोष्टीवर उत्स्पष्ट निर्णय घेणें सभेला सुलभ व्हायचें.

त्यांच्या कारकीर्दीत समितीच्या सदस्यांमध्यें एक प्रकारचें चैतन्य निर्माण झाल्याचें दिसून यायचें. आपल्या प्रत्येक सहकाऱ्याला कामांत गुंतविण्याचें अजब कौशल्य श्री. सिलम यांचेपाशीं आहे. ते स्वतःच कार्यामध्यें तन व मन अर्पण करून कार्य करीत असतांना इतरांना मागें रहाण्याचें धैर्यच होत नाहीं. त्यांच्या एका सहकाऱ्यानें त्यांना एकदां तर प्रेमादरानें म्हटलें देखील कीं, "श्री सिलमसाहेब, तुम्हीं तर खुपच फार 'हार्ड टास्कमास्टर' आहांत." हेंच श्री. सिलम यांच्या आतापर्यंतच्या सामाजिक क्षेत्रांतील यशस्वी नेतृत्वाचें मर्म आहे. समाजशिक्षण समितीचें घर ठिकविण्याचें काम त्यांनीं स्वतः करून दाखविल्यामुळें त्यांच्या इतर सहकाऱ्यांना अधिक काम करण्याची स्फूर्ति मिळाली. समितीसाठी निधी गोळा करणें, थोरामोठ्यांच्या गांठी घेणें, क्षेत्रांतील कार्यकर्त्यांच्या संघटना करणें, समितीच्या अधिकाऱ्यांना लहानसहान बाबींत सल्ला देणें, इत्यादि जवळजवळ सर्व कार्यक्रमांत ते जातीनें भाग घ्यावयाचे. त्यांनीं समितीच्या कार्यांत केलेलें नेतृत्व एवढें विशाल आणि विविध स्वरूपाचें आहे कीं, ते आणखी अनेक वर्षे पुरूं शकेल. ते स्वभावाचे जेवढे कडक वाटतात तेवढेच ते प्रेमळ आहेत. केवळ त्यांची बाह्यतः ओळख करून घेणाऱ्याला कदाचित ते कांटेरी फणसा-प्रमाणें बोंचतील देखील परंतु त्यांच्या मनाचा ठाव घेण्याइतका धीर ज्यांच्यापाशीं आहे त्यांना त्यांच्या मनाची गोडी चाखण्याचा लाभ मिळाल्यावांचून रहाणार नाहीं. जों जों त्यांच्या अधिक जवळ जावें तों तों त्यांच्यांतील विविध गुणांचा अधिक लाभ मिळत जातो. प्रत्येक कामांत विचारशीलता, व्यवहारचातुर्य, धैर्यशील वृत्तीची आवश्यकता आहे, हें श्री. सिलमसाहेबांच्या सान्निध्यांत राहून अधिक शिकतां येईल. व्यक्तिगत अगर सामाजिक जीवनांत ज्या समस्या निर्माण होतात, त्यांना कसें तोंड द्यावें यावर व्याख्यानें व उपदेश ऐकण्यापेक्षा, श्री. सिलमसाहेब अशा समस्या कशा सोडवितात हें पाहून शिक्षण घेतां येईल. ते कुठेहि असोत, त्यांनीं दिलेलें मार्गदर्शन समाज शिक्षण समिति व तिचे कार्यकर्ते यांना खूप काळपर्यंत पुरेल यांत शंका नाहीं.

ईश्वरानें त्यांना खूप आयुष्य द्यावें. मानसिक आणि शारीरिक स्वास्थ्य द्यावें आणि या त्यांच्या गोड सहवासाचा लाभ अनेक सामाजिक कार्यकर्त्यांना आणखी खूप दिवस मिळत राहून, यशस्वी समाजकार्याची ही पवित्र गंगा सतत वाहात रहावी, ही त्या परमेश्वरापाशीं प्रार्थना.

---

# सयाजीराव सिलम यांचें कार्य

लेखक
प्राचार्य दिवाकर डेंगळे

## पुण्याची कला संस्था :

पुण्यासारख्या शिक्षणक्षेत्राच्या ठिकाणीं कलाशिक्षणाची सोय नव्हती. तो अभ्यासक्रम पूर्ण करण्यासाठीं त्यावेळीं विद्यार्थ्यांना मुंबईस जावें लागे. ही अडचण लक्षांत घेऊन, १९३५ सालीं चित्रकलाचार्य नारायणराव पुरम यांनीं 'इन्स्टिटयूशन्स ऑफ मॉडर्न आर्ट' ही संस्था स्थापन केली. त्यांना बडोद्याच संस्थानचें पेंटींग्जचें काम मिळाल्यामुळें तेथें जाण्यासाठीं या कला संस्थेचीं सूत्रें सर्व जबाबदारीसह व अधिकारासह त्यावेळचे त्यांचे शिष्य व संस्थेचे एक हुषार, उत्साही विद्यार्थी श्री. त्र्यंकटेश कृष्ण पाटील यांचेकडे सुपूर्त केलीं. त्यानंतर या खाजगी वर्गाची वाढ श्री. पाटील यांनीं फार मोठ्या प्रमाणावर परिश्रमपूर्वक केली. पुढें त्यांची निवड ' असिस्टंट इन्स्पेक्टर ऑफ् ड्रॉइंग अँड क्राफ्टवर्क ' म्हणून झाल्यानंतर त्यांनीं ललित कला महामंडळाकडे सोंपविलेल्या या कलावर्गाचीं सूत्रें स्वतंत्र सोसायटीकडे प्रगतीचे दृष्टीनें जावीत अशी इच्छा व्यक्त केली. ते स्वतःच त्या वर्गाचे चालक असल्याकारणानें त्यांच्या या सुविचारांचें स्वागतच करण्यांत आलें. त्यानुसार त्या वेळचे ' टिळक कॉलेज ऑफ् एज्युकेशन ' येथील प्राध्यापक व श्री. पाटील यांचे औंध येथील प्रशालेचे प्रमुख्याध्यापक श्री. भा. नि. काळे, भारत हायस्कूल, पुणें या संस्थेचे प्रमुख आधारस्तंभ व मुख्याध्यापक श्री. व. न. कुळकर्णी आणि कै. चित्रकलाचार्य पुरम इत्यादींच्या तात्पुरत्या मंडळानें भारतीय कला प्रसारिणी सभा या लोकनियुक्त सोसायटीची स्थापना करण्याचे दृष्टीनें पुढील पाऊल उचललें व श्री. व. न. कुळकर्णी यांचे सहाय्यानें घटना तयार केली गेली. आणि माझे गुरुजी श्री. पाटील यांचे विचार साकार झाले.

अशा या पुण्यांतील एकमेव कलासंस्थेचे मुरब्बी कार्यकर्त्यांच्या मार्गदर्शनाव्यतिरिक्त अनुभवी, जाणकार व संस्थेसाठीं पैसा उभा करण्याचे दृष्टीनें माहिती असलेल्या नेतृत्वाची अत्यंत आवश्यकता होती. या प्रेरणेनून निरनिराळ्या व्यक्तींकडे पाहिल्यानंतर सयाजीराव सिलम यांना या संस्थेचे अध्यक्ष म्हणून संस्थेस मार्गदर्शन करण्याची विनंति करण्यांत आली. त्यांनीं या संस्थेच्या तळमळीच्या कार्यांकडे लक्ष देऊन ही जबाबदारी संभाळण्याचें आश्वासनहि दिलें. त्यानुसार भारत हायस्कूलचे प्रशस्त दिवाणखान्यांत समारंभपूर्वक १५ ऑगस्ट १९५२ रोजीं मा. सयाजीराव सिलम यांचे अध्यक्षतेखालीं सदरील संस्थेचें रूपांतर

कायदेशीररीत्या एका सोसायटीत झालें. आणि त्यानंतर लवकरच त्यांच्या सुयोग्य नेतृत्वाखालीं संस्थेचा झपाट्यानें कायापालट होऊं लागला. श्री. ब. न. कुलकर्णी यांची कार्याध्यक्ष म्हणून त्यांच्याच अचूक मार्गदर्शनानुसार निवड झाली, व त्यांची ही निवड किती योग्य होती तें संस्थेच्या पुढील बोलक्या प्रगतीवरून सिद्ध केलें. या सुमारासच त्यांचा व माझा परिचय झाला व माझ्यासारख्या तरुण कार्यकर्त्यांपासून संस्थेच्या कोणत्या अपेक्षा आहेत याबाबत त्यांनीं त्याच वेळीं सुस्पष्ट मार्गदर्शन केलें.

सदरील संस्थेचा व्याप जागेच्या अभावी पुण्यांतील निरनिराळ्या गल्लींतल्या तीन अपुऱ्या जागेत होता. तो पसारा एकसूत्रीपणानें व प्रगति साधण्याचें दृष्टीनें लक्ष्मी रोडच्या प्रशस्त जागेंत आणण्याचा त्यांनीं सल्ला दिला. ही योजना कितपत फलद्रूप होईल याची शंका मुळांत कार्यकर्त्यांना होती. तथापि जबाबदाऱ्या वाढवाव्यात, प्रगति करावी आणि त्याप्रमाणें आपले पैसा जमविण्याचें कार्यहि चिकाटीनें वाढवावें हा प्रगतीचा सुयोग्य कानमंत्र श्री सिलम यांनी कार्यकर्त्यांना दिलेलाच होता. आणि त्यांच्या मार्गदर्शनानुसार झालेंहि योग्य असेंच. मोठ्या जागेंत मुलांची संख्या वाढूं लागली होती. पूर्वीची ६० विद्यार्थ्यांची संख्या २५० वर गेली आणि एक दोन वर्षांतच जागा अपुरी पडूं लागली.

आतां मात्र वारंवार व्यापासाठीं जागा भाड्याची घ्यायची नाही, संस्थेनें स्वतःची इमारत बांधण्याचा प्रयत्न केला पाहिजे व त्या दृष्टीनें लवकरांत लवकर प्लॉट घ्यायला पाहिजे, अशी निकड श्री. सिलम यांनीं लावली. कार्यकर्त्यांच्या दृष्टीनें ही गोष्ट केवळ स्वप्नांतच होती. जेथें जेमतेम भाडें भरण्याची तोंडमिळवणी केली जाई तेथें स्वतःची जागा ही गोष्ट अवघडच. परंतु ज्यांनीं अनेक संस्थांच्या प्रगतीस हातभार लावून त्या नावारूपास आणण्यास मदत केली, अशा श्री. सिलमसाहेब यांच्यासारख्या द्रष्ट्यांना ही गोष्ट मुळींच अशक्य वाटली नाहीं. कल्पना आकार झाली. कार्यकर्त्यांनीं जागा पाहिली आणि टिळक रोडवर प्लॉट घेण्याचें निश्चित झालें. आतां रकम कोठून आणायाची ? देणग्या मिळणें नवीन संस्थेस अगदींच अशक्य. परंतु श्री. सिलम यांच्या योजकतेला अशक्य असें कांहींच वाटलें नाहीं. मुंबईच्या दराणीद्वय, श्री. अडीवरेकर, श्री. दादासाहेब आडारकर अशा तळमळीच्या सहकारी कार्यकर्त्यांची त्यांनीं बैठक बोलाविली. पुण्याच्या या एकमेव कलासंस्थेच्या मदतीसाठीं मुंबईकरांना विनंति केली. कु. लता मंगेशकर आदि कलावंतांचा कार्यक्रम संस्थेच्या इमारतनिधीच्या मदतीसाठीं आयोजित करण्यांत आला. जास्तींत जास्त तिकीट विक्री, देणग्या जमविल्या व कार्यक्रम मोठ्या उत्साहानें पार पडला आणि सुमारे रु. २२००० ची रक्कम संस्थेस जमा करून दिली.

मध्यंतरी १९५९ सालीं इमारतीच्या कामाचा वेग थोडा मंदावला असें वाटलें आणि त्यांनीं मोठ्या योजकतेनें त्यांतील कांहीं जबाबदारीचा वांटा कार्याध्यक्ष श्री. आगरवाल व कार्यकारिणीच्या मार्गदर्शनानुसार मला उचलण्यास सांगितलें आणि इथूनच त्यांचा

अन् माझा जवळचा परिचयाचा योग आला. या काळांतच त्यांचे इच्छेविरुद्ध त्यांना मित्रत्वाच्या दृष्टीनें अत्यंत जवळच्या अशा व्यक्तींना दुखविण्याचा प्रसंग आला. पण प्रथम संस्थेचें हित या न्यायानुसार त्यांनी तेंहि मोठ्या धीमेपणानें केलें व तितक्याच प्रेमळपणानें दुखाविलेल्या कार्यकर्त्यांची समजूतहि काढली. या गोष्टींत त्यांच्या समतोल न्यायबुद्धीचें दर्शन घडलें. माझा अनुभव हा अतिशय मर्यादित. तथापि श्री. विल्म यांना निरनिराळ्या व्यक्तींकडून काम उत्तमपणें करवून घेण्याची जी शैली आहे, त्यामुळेंच तें काम जिद्दीनें पुरें करण्यास प्रवृत्त केलें. कांटेकोर हिशेबीपणावर श्री. विल्म यांचा कटाक्ष असे. विशेष कोठें वाजवीपेक्षां थोडासुद्धां जादा पैसा खर्च होता कामा नये इकडे त्यांचें जागरूकतेनें लक्ष असे. विशेष प्रसंगीं गोड शब्दांत कानपिचक्यादेखील द्यावयास ते कमी करीत नसत. त्यानंतर देखील वेळोवेळीं निरनिराळ्या नामवंत व्यक्तींना संस्था दाखविणें, त्यांचे मनांत संस्थेविषयीं आस्था निर्माण करणें, शक्य तर त्यांना मनांपासूनच या संस्थेला कांहीतरी मदत करण्याची प्रेरणा निर्माण करणें ही गोष्ट केवळ विल्मसाहेबच करूं जाणे.

याच त्यांच्या प्रयत्नांतून श्रीमानशेठ मंगळदास वर्मा यांनीं वीस हजारांची देणगी संस्थेच्या इमारत योजनेस दिली व आणखीहि वर्मा हॉलच्या प्रदर्शनीयतेच्या दृष्टीनें ती परिपूर्ण करण्यासाठीं येणारा खर्चही देणगीरूपानें देण्यास ते आनंदानें तयार झाले. श्री. फोर्दून इराणी यांनीं रु. १५०० ची देणगी, श्री. त्रिपुरामशेठ गान्धी यांनीं सुमारें २५०० च्या इमारत फिटींगची देणगी व श्री. म. पां. नाईक यांचे प्रयत्नानें कॉर्पोरेशनकडून सर्व दहा हजारांची देणगी मिळविण्यांत यश मिळविलें, हा त्यांच्या तळमळीचा, तसेंच सक्रीय व सढळ कार्याचा पुरावा आहे.

आज या संस्थेचें स्वप्न पुण्याच्या टिळकरोडसारख्या राजरस्त्यावर मध्यनेनें साकार झालेलें दिसून येत आहे. संस्थेची भव्य इमारत आजच्या व्यापाला अपुरी पडत आहे. विद्यार्थ्यांची संख्या वाढत आहे, कलाशिक्षणाचा दर्जाहि उंचावत आहे. आणि या सर्व प्रगतीला संस्थेच्या निरनिराळ्या तळमळीच्या कार्यकर्त्यांबरोबर विल्म यांचे अचूक मार्गदर्शन, अमोल सल्ला व सक्रीय सहानुभूति आणि संस्था भक्कम पायावर उभी करण्यास मदत करण्याची तळमळ, या गोष्टी कारणीभूत आहेत यांत शंका नाहीं. या लेखाच्या निमित्तानें हें आदरपुष्प त्यांना अर्पण करून त्यांना दीर्घायुरारोग्य लाभावें व संस्थेस वेळोवेळीं असेंच मार्गदर्शन लाभावें हीच परमेश्वराजवळ प्रार्थना!



# हरिजनसेवक सयाजीराव सिलम

लेखक

खासदार श्री. नारायणराव काजरोळकर

**एकनिष्ठ समाजसेवक :**

" दुरितांचे तिमिर जावो।
विश्वस्वधर्म सूर्ये पाहो।
जो जें वांछिल तो तें लाहो।
प्राणीजात ॥ "

संत रामदासांच्या या महान शिकवणीनें भारलेले, समाज सेवेच्या स्थंडिलावरून आपल्या सेवामय कर्तव्याचा मार्ग आक्रमण करणारे आणि सौजन्य, सेवावृत्ति नि बंधुभाव यांचे पुजारी असे श्री. सयाजीराव सिलम यांची नि माझी ओळख सन १९४५ सालापूर्वी झाली. त्यावेळच्या समाजसेवक कार्यकर्त्यांपैकी ते एक प्रमुख होते, पण त्यांच्या सेवाभावाची पद्धति कांहीं वेगळी आहे. अडचणींत सांपडलेल्यांची प्रेमळपणें विचारपूस करणें, त्यांच्या भावनांची हळुवारपणें उकल करणें, आणि त्यांना योग्य असें मार्गदर्शन करणें, या गोष्टी म्हणजे त्यांच्या स्वभावाचें एक आगळें आकर्षण आहे नि त्याच आकर्षणानें मीहि त्यांच्याकडे ओढला गेलों आहे.

श्री. सिलम यांच्याकडे प्रथम पाहाणारा माणूस थोडासा दचकेल. त्यांच्या झोकदार मिशा, उंचापुरा देह, झोकदार गांधी टोपी घालण्याची तऱ्हा, या साऱ्या गोष्टी आहेतच तशा; परंतु श्री. सिलमसाहेबांनीं एकदां बोलायला सुरवात केली कीं, मग मनातली सारी भीति दूर पळून जातें नि तिची जागा घेतो जिव्हाळा, नि आपुलकी. कारण त्यांच्या बोलण्यांत तशी किमयाच आहे ऐकणारा माणूस परिस्थितीनें कितीही गांजला असला तरी सिलमसाहेबांच्या शब्दानींच तो निम्मा अधिक सावरला जातो या त्यांच्या स्वभावामुळे ते लोकांत फारच प्रिय झाले आहेत.

मुंबईतल्या कामाठीपुरा या विभागांत श्री. सयाजीराव सिलम आणि श्री. पुप्पाला या दोन व्यक्ती अतिशय नांवाजलेले कार्यकर्ते म्हणून प्रसिद्ध होत्या. विशेषतः मागासलेल्या वर्गाला नि हरिजन बांधवांना त्यांच्याबद्दल फारच आपले-पणा वाटे; कारण त्यांच्यासाठीं श्री. सिलम अहोरात्र कार्य करीत. कोणत्याहि

कठीण समयाला वेळकाळाचें बंधन न ठेवतां ते धांवून येत आणि म्हणूनच त्या समाजातले सारे नागरिक त्यांना आपला भाता म्हणूनच ओळखत असत.

माझी श्री. सिल्मसाहेबांबरोबर ओळख झाली तेथपासून मी त्यांच्या नागरिक सेवेच्या कार्यपद्धतीकडे विशेष निष्ठापूर्वक लक्ष देत आलों आहे. कामाठीपुऱ्यांतल्या त्यांच्या घरीं सकाळ सायंकाळ माणसांची रीघ लागलेली असे. आपल्या अडी-अडचणी नि गाऱ्हाणी तीं माणसें सिल्मसाहेबापुढें मांडीत. त्यांच्या सर्व अडचणींचा विचार करून ते त्यांना योग्य मार्गदर्शन करीत नि जाणारा प्रत्येक माणूस समाधानी चेहेऱ्यानें घरांतून बाहेर पडे. "राखावी बहुतांचीं अंतरें।" ही संतवाणी त्यांच्या स्वभावांत जणुं चिंतन ओघवती आहे.

हळुहळू श्री. सिल्म यांचा नि माझा परिचय दाट होत गेला. सार्वजनिक कार्यासंबंधीं आमच्या चर्चा होऊं लागल्या. आम्ही इतके एकत्र आलों कीं, आमच्यांत एक-बंधुत्वाचें नवीन नातें निर्माण झालें. फोर्टमध्यें असलेल्या आमच्या "स्टार ऑफ् इंडिया" या त्या वेळच्या डेअरीवर ते दररोज येऊं लागले. सायंकाळीं तीन ते सहा या वेळांत मुंबईतील व इतर ठिकाणचे समाजकार्यकर्ते त्यांना तिथें भेटावयास यायचे. नि त्या-निमित्तानें मलाहि अनेक प्रमुख समाजकार्यकर्त्यांचा सहवास घडत असे. प्रत्येकाचे आचार-विचार, स्वभावधर्म या साऱ्या गोष्टी आम्हांला तिथें निरखतां आल्या.

दिवसेंदिवस श्री. सिल्म यांचें आमच्याकडे येणें वाढूं लागलें. तसा मुंबईतल्या बऱ्याच मंडळींत एक गमतीदार समज निर्माण होऊं लागला. मला लोक विचारूं लागले, "सिल्म तुमच्या डेअरीच्या व्यवसायांत भागीदार आहेत कीं काय?" आणि असे प्रश्न ऐकून मीहि त्यांना तसेंच उत्तर देई कीं, श्री. सिल्म हे आमचे खरोखरच भागीदार आहेत, पण डेअरीच्या व्यवसायांत नव्हे; जें समाजकार्याचें व्रत आम्ही अंगिकारिलें आहे त्यांत त्यांची भागीदारी मोठी आहे.

पुढें मुंबई महानगरपालिकेंत आम्ही निवडून आल्यावर श्री. सिल्मसाहेबांचें जें मला मार्गदर्शन लाभलें तें अविस्मरणीय आहे. सार्वजनिक कार्य करतांना जनतासंपर्काला किती महत्त्व आहे हें मला त्यांच्याकडून बरेचसें शिकतां आलें.

त्याग, निःस्वार्थबुद्धी हे त्यांच्या गुणांतले आणखी पैलू आहेत. चांगल्या प्रकारे चाललेल्या आपल्या वकिलीचा त्यांनीं केवळ समाजकार्याच्या आस्थेनें त्याग केला.

भर्तृहरी शतकांत वामनपंडितानें सत्पुरुषाचे सहा गुण सांगितले आहेत की,

"विपत्काळी धैर्य प्रभुपणि महिष्णुत्व बरवें।
सभे पांडित्याचा प्रसर, समरीं शौर्य निरवें।
स्वकीर्तीच्या ठायीं प्रचुर रति विद्याव्यसन जें।
तयांचे हे स्वाभाविक गुण सहा सत्पुरुष जे।"

या काव्यपंक्ती वाचल्या की, श्री. सयाजीराव सिलम यांचे स्वभावचित्र डोळ्यांसमोर उभे राहते. कोणत्याहि कठिण प्रसंगी न डगमगता निर्भीडपणे कार्य करणे या सर्व प्रसंगांत परधर्मसहिष्णुता पाळणे, या सर्व गुणांचे रेखीव चित्र म्हणजे श्री. सयाजीराव सिलम होत.

मुंबईत एके काळी हिंदुमुसलमानांच्या धार्मिक दंगली होत तो काळ सर्वांना आठवत असेल, परंतु त्याहि काळांत कामाठीपुऱ्यासारख्या विभागात राहून त्यांनी दोन्ही धर्मियांत बंधुत्व नांदविण्याचा प्रयत्न केला. त्यावेळी अनेक मुसलमान बांधव श्री. सिलम यांच्याकडे संरक्षणासाठी सहाय्य मागावयास येत आणि अशावेळी कुठलाहि धर्मभेद वा जातिभेद न मानता त्यांनी आपल्यातल्या सहकार वृत्तीने त्यांना सहाय्य केले. व त्या काळांत हिंदुमुसलमानांतले वितुष्ट संपुष्टांत आणण्याच्या एका महान् कार्यात हातभार लावला.

गिरगांव चौपाटीवर आज सन्मानाने उभा असलेला लोकमान्य टिळकांचा पुतळा पाहिल्यावर सिलमसाहेबांची आठवण झाल्यावाचून रहात नाही. हा लोकमान्यांचा जो पुतळा आज दिसतो आहे तो उभारण्याच्या कार्यातला अधिक वांटा श्री. सिलमसाहेबांचा आहे. त्यांच्या या कामगिरीबद्दल मुंबईतली तमाम जनता त्यांना अजूनहि धन्यवाद देत आहे.

श्री. सिलम यांनी ज्या ज्या कार्यांत पदार्पण केले तें तें कार्य आपल्या कर्तव्यनिष्ठेने व कुशल कारागिरीने उज्वल केले. मुंबईच्या "लेजिस्लेटिव्ह असेंब्ली" मध्ये त्यांनी चीफ् व्हीप् चें कार्य मोठ्या कुशलतेने केले. संयुक्त महाराष्ट्राची चळवळ सुरू असतांना ते मुंबई विधानसभेचे सभापति होते. विरोधी पक्षातील रथी महारथी आपापल्या भाषणांनी सभागृह हादरवून सोडीत. त्यावेळी मुंबईतलें वातावरण कांहीसें तंग होतें. पण या साऱ्या परिस्थितीत सभागृहाची प्रतिष्ठा राखण्याची आपली जबाबदारी त्यांनी खंबीरपणे अन् चोख रीतीने पार पाडली. विरोधी पक्षाने व विशेषतः आचार्य अत्रे यांनीहि त्यांच्या या कामगिरीबद्दल त्यांचा गुणगौरव केला हें विशेष होय.

सन १९६२ साली विधानसभेत कॉंग्रेसचे उमेदवार म्हणून ते निवडून आले, पण त्याबरोबरच त्यांचे शैक्षणिक आणि सामाजिक कार्य अविरत चालूच होतें. अजूनहि अनेक सामाजिक आणि शैक्षणिक संस्थांशी त्यांचा निकटचा संबंध आहे. या सेवाभावांत त्यांनी कधीहि खंड पडूं दिला नाही.

विधानसभेचे सभापति असतानाचें त्यांचें कार्य त्यावेळचे गव्हर्नर श्री श्रीप्रकाश यांनी जवळून पाहिलें नि त्याबद्दल मोठ्यापाशी चांगले उद्गार काढले. श्री. श्रीप्रकाश अजूनहि त्यांच्याबद्दल आत्मीयतेने चौकशी करतात. ते त्यांचे एक सच्चे मित्र आहेत.

त्यावेळचे महाराष्ट्राचे मुख्य मंत्री व आजचे भारताचे संरक्षण मंत्री श्री. यशवंतरावजी चव्हाण, रेल्वेमंत्री श्री. स. का. पाटील यांनाहि त्यांच्या कार्याचा प्रत्यक्ष अनुभव होता.

सेवक समाज इत्यादी संस्थांमार्फत त्यांनी आत्मत्यागमोवती निष्ठावंत कार्यकर्त्यांची एक सुरेख मालिका तयार केली. त्यामुळे हे सगळे कार्यकर्ते मुंबईतील सर्व कार्यांत उत्साहानें आणि निरपेक्षपणे काम करतांना दिसत. इतकेंच नव्हे तर जबाबदारीची जाणीव ठेवून कार्यकर्ता आपलें काम चोखपणें पार पाडी. श्री. खिलमसाहेब यांच्या नेतृत्वामुळें मुंबईतील अनेक सामाजिक संस्था कार्यप्रवण झाल्या; सामाजिक कार्यकर्त्यांत विश्वास निर्माण झाला आणि त्यामुळें कार्याबद्दल आपुलकी वाटली. याचें बरेचसें श्रेय खिलमसाहेब यांनाच द्यावें लागेल.

त्यांचा सत्तरावा वाढदिवस मुंबईत मोठ्या उत्साहानें साजरा व्हावा ही एक अत्यंत उचित घटना आहे. त्यांचे सर्व सहकारी, मित्र, कार्यकर्ते आणि सर्व मुंबईकर यांनी या निमित्तानें ईश्वराकडे एकच प्रार्थना असणार की, त्यांना यापुढेंहि आयुष्य, आरोग्य यांचा लाभ होऊन त्यांच्याकडून अधिकाधिक जनसेवा घडो.



# सभापति सिलम

लेखक
आचार्य प्र. के. अत्रे.

पंधरा मार्च १९६२ ला नव्या महाराष्ट्र विधानसभेच्या अधिवेशनाला सुरवात होईल, आणि सतरा मार्चला नव्या सभापतींची निवड होईल. नवीन महाराष्ट्र विधान सभेत काँग्रेसचे दोनशे चौदा आणि विरोधी पक्षाचे पन्नास सभासद निवडून आलेले आहेत. काँग्रेसच्या बाजूकडे अनेक नव्या चेहऱ्यांची गर्दी झालेली जरी आढळून आली, तरी जुन्या चेहऱ्यांत नरवणे-काझी वगैरे दहा-पांच नग वजा केले तर बाकीचे परिचित चेहरे आपापल्या जागांवर पूर्वीप्रमाणेंच विश्रब्धपणें विराजमान झालेले आढळून येतील. ह्याच्या उलट विरोधी पक्षाच्या छावणींतल्या पूर्वीच्या बहुतेक सान्या रथीमहारथींची आठवण त्यांच्या गैरहजेरीमुळें विशेष जाणवल्यावांचून रहाणार नाहीं. आर. डी. भंडारे, व्ही. एन. पाटील, उद्धवराव पाटील, व्ही. डी देशपांडे, दत्ता देशमुख, जयंतराव टिळक, वर्धन, एस्. एम्. जोशी, म्हाळगी, विमलाबाई बागल यांचें स्मरण अधिकारारुढ पक्षाला नि वरच्या गॅलरींतील प्रेक्षकांना पदोपदीं जाणवल्यावांचून रहाणार नाहीं. या निवडणुकीच्या वादळांत विरोधी पक्षाची एवढी वाताहत होईल असें स्वप्नांतदेखील पूर्वी कोणाला वाटलें नसेल. खादीच्या पोषाखातले काँग्रेसचे दोनशे चौदा आमदार विधान सभेंत आपापल्या जागेवर स्थानापन्न झाल्यानंतर या विधान सभेला एखाद्या "खादी भांडारा" चें स्वरूप आल्यावांचून रहाणार नाहीं, अशी आमची कल्पना आहे. म्हणून नव्या महाराष्ट्र विधान सभेचें स्वरुप आमूलाग्र बदलून गेलेलें दिसलें, तर आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं. तथापि त्याबद्दल आमची मुळींच तक्रार नाहीं. हें असें चालायचेंच. राजकारणात दर पांच वर्षांनीं मोठमोठे बदल झाले नाहींत तर नवलच. जुन्या गोष्टी जावयाच्या, नव्या गोष्टी यावयाच्या. त्यासाठीं आपण आपल्या मनाची तयारी करून ठेवायलाच हवी. तथापि, काहीं काहीं जुन्या गोष्टी गेल्याबद्दल मनाला विषाद वाटणें मात्र अपरिहार्य आहे. पुढील पांच वर्षे महाराष्ट्र विधान सभेमध्यें असताना एका व्यक्तीची आठवण मात्र आम्हांला सतत झाल्याविना रहाणार नाहीं. आणि ती व्यक्ति म्हणजे गेलीं पांच वर्षें महाराष्ट्र विधान सभेच्या सभापतिपदीं स्थानापन्न असलेली श्री. सयाजीराव सिलम ही व्यक्ति होय. आम्हाला पूर्वीच्या कायदेमंडळाचे सभापति दादासाहेब मावळंकर किंवा नानासाहेब कुंटे ह्यांची प्रत्यक्ष माहिती अशी विशेष काहीं नाहीं. जी आहे ती ऐकीव आहे. पण त्यांच्याबद्दल मोठ्या आवडीने किंवा अभिनिवेशानें बोलणारीं माणसें आम्हांला

श्री. सिल्म यांच्या कार्याबद्दलची जाणीव पंडित नेहरूजींना होती व त्यावेळचे गृहमंत्री श्री-लालबहादूर शास्त्री व राष्ट्रपति यांनाही त्यांच्या कार्याची कल्पना होती नि या गोष्टींचे फलश्रुतर म्हणजेच त्यांनी पॉंडेचरीचें लेफ्टनंट गव्हर्नर म्हणून झालेली निवड होय. परमेश्वर करो आणि लवकरच गव्हर्नर म्हणून त्यांचा सत्कार आणि सन्मान करण्याची सुसंधी आम्हांस लाभो.

या कर्तव्यनिष्ठ कार्यकर्त्यांच्या कार्यशक्तीचा चांगला उपयोग करून सरकारनें त्यांची नायब राज्यपाल म्हणून नेमणूक केल्यावर पंडितजींनी व श्री. शास्त्रीजींनी त्यांना बोलावलें व सांगितलें "पॉंडिचरीचें वातावरण थोडें गढूळ आहे नि तें निवळण्यासाठीं आपल्यासारख्या कुशल नेत्याची आवश्यकता आहे. आम्हाला आशा आहे कीं, आपण आपल्या कौशल्यपूर्ण कार्यपद्धतीनें सान्या गोष्टी सुसूत्रपणें हाताळल्याशिवाय राहाणार नाही."

पॉंडिचरीला जाण्याची संधि मला दोन वेळां आली आहे. तेथील मंत्रीमंडळावर व जनतेवर सिल्मसाहेबांची चांगलीच छाप पडली आहे. नागरिकांत त्यांच्याबद्दल आदरभाव निर्माण झाला आहे. सुवर्णाच्या, हिन्याला अथवा माणिकास कुठेंहि टाकलें तरी त्याचे गुणधर्म लपत नाहींत हेंच खरें. श्री. सिल्म यांच्या कार्याबद्दल पंडित जवाहरलाल नेहरू व श्री. लालबहादुर शास्त्री यांनी माझ्याजवळ धन्योद्‌गार काढले आहेत.

श्री. सिल्म हे मला वडील बंधूंच्या जागी आहेत, इतके आमचे जवळचे संबंध आहेत आणि ते वयानेंहि माझ्यापेक्षा दीड महिन्यानें मोठे आहेत. श्री. सिल्म, मी व माझे धाकटे बंधू श्री. रामचंद्र असे आम्ही अनुदिह बंधुभावानें रहातो. गर्व त्यांना कधीं शिवला नाहीं. कितीहि उच्च पदावर गेले तरी ते आपल्या मूळच्या प्रेमळ आणि सहकार्यशील स्वभावाला सोडणार नाहींत, याची मला खात्री आहे.

हरिजनासाठीं त्यांनी केलेलें कार्य कोणतीहि व्यक्ति विसरणार नाहीं. आज ते पॉंडे-चरीचे नायब राज्यपाल आहेत, पण तिथल्या लोकांच्या सेवेंत मग्न असतानाहि ते महाराष्ट्राला विसरलेले नाहीत.

आज त्यांना वाढदिवस आहे. त्यांच्या वाढत्या वयाबरोबरच त्यांच्याठायीं जनसेवेची वृत्ती वाढत आहे. जनसेवा हा त्यांच्या आत्म्याचा एक भागच होऊन गेला आहे आणि त्यांची ही कार्यशक्ति अशीच वृद्धिंगत होण्यासाठीं आपण ईश्वराकडे प्रार्थना करूंया. ईश्वरानें त्यांना चिरायुरारोग्य देऊन त्यांची जनसेवेची ईर्षा पूर्ण करण्यासाठीं सामर्थ्य द्यावें अशी मी जगन्नियंत्याकडे प्रार्थना करतो.

---

# श्री. सयाजीराव सिलम

लेखक

श्री. मधुकरराव चौधरी,
शिक्षण मंत्री, महाराष्ट्र राज्य

राज्यविधान सभेच्या उंच व्यासपीठावर एक धीरगंभीर व्यक्ति बसलेली असे. तरतरीत नाक, मिशांचे वळलेले आंकडे, दृष्टींत कांहींसा कठोर भाव, आवाज भरदार व खणखणीत अशा या सभापतींना पाहून नवखा सभासद बचकूनच भीतीयुक्त आदराची नजर व्यासपीठाकडे लावूनच तो आपलें भाषण करी. ही व्यक्ति म्हणजे श्री. सयाजीराव सिलम होत हें सांगावयास नकोच. राज्यविधानसभेचे सभापति म्हणून त्यांनीं काम केलें तेव्हां सिलम व सभापति हे समीकरण मनांत इतकें पक्कें रुजलें होतें कीं, कोणतें पद कोणी भूषविलें याविषयीं संभ्रम निर्माण व्हावा. विधान सभेंत निरनिराळ्या पक्षांचीं, निरनिराळ्या प्रकृतीचीं माणसें, पण सयाजीरावांचा दरारा सर्वांवर सारखाच. त्याचा आवाज एकदां सभागृहांत निनादला कीं, सभासद कितीहि अवखळ असला तरी तो आवरतें घेई.

पण सभापती म्हणून सिलमसाहेबांचा जरी असा दरारा वाटला तरी प्रत्यक्षांत भेट झाली म्हणजे अगदीं वेगळाच अनुभव येई. त्यांच्या बाह्य कठोरतेची जागा स्नेहार्द्र दृष्टि घेई आणि तुम्ही आपल्या अगदी जिवलग स्नेह्याशीं बोलत आहांत असें वाटे. त्यांच्या स्वभावांतील ऋजुता, तुम्हाला समजून घेण्याची त्यांची वृत्ती, बोलण्यातील मनमोकळेपणा यामुळें सिलमसाहेब तुमचें मन चटकन् जिंकून घेतात. हा अनुभव कॉंग्रेस पक्षांतील लोकांनाच येई असें नव्हे, तर विरोधी पक्षातील लोकांनाहि तेवढाच येई. यामुळें सयाजीराव हे राज्य विधान सभेचे एक अत्यंत लोकप्रिय व तितकेच कार्यक्षम सभापति झाले असें म्हणावयास मुळींच प्रत्यवाय नाहीं. सर्वांत मिळून मिसळून व सर्वांना सांभाळून घेणाऱ्या सयाजीरावांच्या कारकीर्दीचा स्मृतिग्रंथ यामुळेंच सर्वांच्या चिरस्मरणात सदैव राहील.

मुंबई शहरातील सामाजिक कार्यकर्ते आणि संस्था यांच्याशीं समरस होऊन लोकोपयोगी कार्य पद्धतशीरपणें परंतु एकमेकांच्या सहकार्यानें व्हावें याशीं सिलमसाहेबांनीं सर्वांना एक दिशा दाखवून दिली. नशाबंदी, समाजशिक्षण, भारत

आजवर भेटलीं नाहींत. सभापतिपदावर असतांना आपल्या व्यक्तिमत्वावरील काँग्रेसची छाप दादासाहेब मावळंकरांना कधीं पुसतां आली नाहीं असें म्हणतात. तर आपण दिलेला निर्णय बरोबर असलाच पाहिजे हें सिद्ध करण्यासाठीं शाब्दिक वादावादी करण्याचा मोह नानासाहेब कुंटयांना कधीं आवरतां आला नाहीं असें सांगणारे सांगतात. पूर्वीच्या सभापतींबद्दल आम्ही ऐकलेली ही माहिती जर खरी असेल तर सभापति सिलम ह्यांच्या कारकीर्दीला फारच वेगळा उठाव मिळाल्याखेरीज रहाणार नाहीं. सभापति सिलम ह्यांचें सर्वांत मोठें आकर्षण म्हणजे विधानसभेच्या सभापतीला आवश्यक असणारें त्यांचें रूबाबदार आणि भरदार व्यक्तिमत्व, त्यांचे काळेभोर डोळे, त्यांची करडी नजर, त्यांच्या पिळदार मिशा, त्यांची बांधेसूद उंच अन् ताठ अंगयष्टी आणि त्यांचा खणखणीत आवाज ह्यामुळें दुपारी बरोबर एक वाजतां विधानसभेच्या प्रारंभीच्या इशाऱ्याचीं घंटा बंद होताच, "मिस्टर स्पीकर" असा चिटणीस उभे राहून जेव्हां पुकारा देत तेव्हां सारें सभागृह एकदम निःस्तब्ध होऊन पायावर उभें राही, अन् लाल भाल्याचा भालदार पुढें अन् मागून सभापति सिलम यांचा गंभीर चेहेरा पाहिला कीं, सर्वांना खरोखरच 'सभापति' आल्यासारखें वाटे. योग्य स्थानावर योग्य माणसाची निवड होण्यासारखी मौज नाहीं. लहान स्थानावर मोठ्या माणसाची किंवा मोठ्या स्थानावर लहान माणसाची नेमणूक होण्यासारखें दुःख नाहीं. सभापतींच्या भव्य खुर्चीवर सयाजीराव सिलम बसले म्हणजे ते स्वतः जसे शोभून दिसत तशी त्या खुर्चीलाहि शोभा येई. परवां राज्यपाल श्रीप्रकाश ह्यांनीं सभापति सिलम ह्यांच्या पिळदार मिशावर विनोद करून, "त्या मिशांच्या आंकड्यानीं पांच वर्षे विधान सभेत दरारा दरारा केला" असें गमतीनें सांगितलें. पण त्यांत विनोदापेक्षां सत्यच जास्त होतें. सभापति सिलम खुर्चीवर असले म्हणजे सभागृहांत केवढ्याहि खळबळीची चर्चा चालो किंवा उभय पक्षांत कितीहि ताणा-ताणीचीं उत्तरें प्रत्युत्तरें चालोत, पण सभापतींच्या अस्तित्वाकडे दुर्लक्ष करणें किंवा त्याचा गैर-फायदा घेणें ही गोष्ट सर्वस्वी अशक्य असे. सभापतींनीं आपल्या हुकमी आवाजांत, 'खाली बसा' असा एकदां आदेश दिल्यानंतर, तो आदेश धाब्यावर बसविण्याची कोणाला हिम्मतहि होत नसे, असा सभापति सिलम यांचा सभागृहामध्यें धाक असे. द्विभाषिक राज्य अस्तित्वांत असताना राज्यकर्त्या पक्षाचा धिक्कार करण्याचा किंवा सभागृहांतील कामकाजावर बहिष्कार घालण्याचा अनेकदां प्रसंग येई. त्यावेळीं घोषणांनीं आणि गर्जनांनीं आम्ही समितीचे आमदार सारें सभागृह अक्षरशः डोक्यावर उचलून घेत असूं, पण अशा बिकट वेळींसुद्धा सभापति सिलमनीं आपलें व्यक्तिमत्व किंवा आपला प्रभाव यत्किंचितहि कधींहि ढाळूं दिला नाहीं. वादळांत हेलकावे खाणाऱ्या जहाजाचा कप्तान ज्याप्रमाणें खंबीरपणें सुकाणूं आपल्या हातांत धरून ठेवतो, त्याप्रमाणें सभागृहाच्या शिस्तीचीं सूत्रें अशा वेळीं ते आपल्या हातीं बळकटपणें पकडून उभे असत, ही गोष्ट अनेकदां आम्ही कृतज्ञतेनें पाहिलेली आहे. पांच वर्षांत सभागृहाच्या प्रतिष्ठेस किंवा

गांभीर्याला एकदांहि कधीं त्यांनीं गालबोट लावूं दिल्याचें आम्हांला आठवत नाहीं. त्याचप्रमाणें ते जरी कॉंग्रेस पक्षाचे सभासद असले, तरी सभागृहांतील त्यांच्या वर्तनांत, भाषणांत किंवा निर्णयांत पक्षपातीपणा औषधापुरतासुद्धां कधी आम्हांला आढळून आला नाहीं. उलट विरोधी पक्षाला वादांत जास्त मदत करण्याकडे आणि सवलती देण्याकडे त्यांच्या मनाचा कल असे. भाषाप्रभुत्व हा त्यांच्या अंगांतला एक गुणविशेष वाखाणण्यासारखा आहे. इंग्रजी, मराठी, उर्दू या गुजराती, कोणतीहि भाषा असो, त्या भाषेंत ते अगदीं रेखीव आणि ठांशीव वक्तृत्व करतात. बोलतांना रेंगाळणें, अडखळणें किंवा चाचरणें या गोष्टी त्यांना माहीतच नाहींत. त्यामुळें त्यांच्या प्रत्येक वाक्याचें सभागृहावर वजन पडल्यावाचून राहत नसे. त्याचप्रमाणें स्मरणशक्ति हें त्यांचें सर्वांत मोठें वैशिष्ट्य असे. सभागृहांत दोनशें चौसष्ट आमदार होते. तरी त्यापैकीं प्रत्येकांना त्यांच्या नांवानें ते न चुकतां संबोधूं शकत, हें पाहून आम्हीं थक्क होत असूं. सभागृहांत अनेकदा कायदेशीर वाद निर्माण होत. अशा वेळीं न गोंधळतां किंवा न बिचकतां खंबीर-पणें निर्णय देण्यांत सभापति सिलम ह्यांचा हातखंडा असे. तथापि बाहेर, सभागृहांत एवढ्या करडेपणानें आणि कडकपणानें वागणारे सभापति सिलम आंत त्यांच्या कचेरीमध्यें गेलें म्हणजे मूर्तिमंत सौजन्यमूर्ति भासत. दक्षता, सौजन्य आणि संयम ह्यांचा दिमाखदार समन्वय म्हणजे सभापति सयाजीराव सिलम असें त्यांच्याबद्दल सारांशानें सांगतां येईल. नव्या महाराष्ट्र विधानसभेंत त्यांच्या वैशिष्ट्यपूर्ण व्यक्तिमत्त्वाची अनुपस्थिति अनेकांना जाणवल्याखेरीज राहाणार नाहीं. आम्हांला तरी ती नक्कीच विशेष जाणवेल.



# सिलमांचें मार्गदर्शन

लेखक : श्री. शं. ह. आदिवडेकर

मुंबई शहरांतील सार्वजनिक जीवनावर ज्यांनीं आपल्या व्यक्तिमत्वाचा ठसा उमटविला अशा चारित्र्यसंपन्न व्यक्तींपैकी एक ज्येष्ठ व्यक्ती म्हणजे श्री. सिलमसाहेब हे होत. आपल्या चाळीस वर्षांच्या सार्वजनिक जीवनांत त्यानी मुंबई शहरांतील अनेक क्षेत्रांत कार्य केले, प्रत्येक क्षेत्रांत जेथे जेथे त्यांचा संबंध आला तेथे तेथे त्यांनी काही वैशिष्ट्ये निर्माण करून ठेवलीं आहेत. प्रत्येक कार्यक्षेत्रांत त्यांनीं आपला निश्चित ठसा उमटवून ठेवला आहे. मुंबईतील ज्या अनेक सार्वजनिक संस्थांशीं त्यांचे घनिष्ट संबंध आले अशा संस्थांची संख्या अक्षरशः हजारोंच्यावर भरेल. त्यांची एकंदर कामगिरी विविध प्रकारची असली तरी त्यांनी ज्या क्षेत्रांत विशेष लक्ष घातलें तें क्षेत्र म्हणजे दारूबंदी हे होय. दारूबंदीचें कार्य हे त्यांनी आपल्या सर्व कार्यांचें अधिष्ठान मानले आहे. ज्याप्रमाणें गांधीजींनीं म्हटले आहे की, दारूबंदी यशस्वी झाल्याशिवाय कोठल्याही सुधारणा घडून येणार नाहीत, त्याप्रमाणे श्री. सिलमसाहेबांनी दारूबंदी ही सर्व सामाजिक सुधारणेचा पाया मानला आहे व म्हणूनच त्यांनीं पहिल्यापासून मुळांतच दारूबंदी कार्याला हात घातला. स्वातंत्र्यपूर्व काळांतील त्यांचे ह्या क्षेत्रांतील प्रयत्न लोकांना परिचित आहेत. कांहीं नियमित मर्यादित १९३५ साली ज्यावेळीं कॉंग्रेसनें राज्याची अधिकारसूत्रें हातीं घेतली व दारूबंदी कायदा अंमलात आणला त्यावेळी श्री. सिलमसाहेबांची पहिला मानद दारूबंदी कमिशनर म्हणून नेमणूक झाली होती. ती कदाचित कांहींना माहिती नसेल. १९४७ च्या स्वातंत्र्यानंतर निवडून आलेल्या कॉंग्रेसमंत्रीमंडळाने ज्यावेळीं अधिकारसूत्रें हातीं घेतलीं व दारूबंदीचें धोरण जाहीर केलें त्यावेळीं तर त्यांच्यावर अधिकच जबाबदारी येऊन पडली. दारूबंदीच्या क्षेत्रांत त्यांचे नि मासे घनिष्ठ संबंध आले. त्यांनी यावत्‌ लोकाभिमुख असे जे मार्गदर्शन केले त्यामुळें दारूबंदीच्या क्षेत्रात काम करणाऱ्या कार्यकर्त्यांचा उत्साह दुणावला. आपल्याबरोबर काम करतांना त्यांनीं सर्व क्षेत्रांतील कार्यकर्त्यांना तळमळीनें मार्गदर्शन केलें. कार्य करतांना हा लहान, हा मोठा असा भेदभाव त्यांनीं केला नाहीं. १९४९ झालीं दारूबंदी मोहिमेचें उद्घाटन मुंबईत होणार होते. त्यावेळचा सप्ताह अनेक तऱ्हेनें गाजला. हा पहिलाच सप्ताह होता. मी त्या कार्यात नुकताच प्रवेश केला होता. समारंभाचे मुख्य पाहुणे भारताचे पहिले राष्ट्रपति डॉ. राजेंद्रप्रसाद हे व विनोबा भावे उपस्थित रहाणार होते. फार मोठी जबाबदारी कार्यकर्त्यांवर येऊन पडली होती. परंतु सिलमसाहेबांनी अगदी बारीक सारीक गोष्टीत लक्ष घालून सर्व जबाबदारी पूर्णांशें पार पाडली. त्यावेळी जी प्रचंड मिरवणूक निघाली होती त्या मिरवणुकीचा सोहळा इतका वैशिष्टपूर्ण

होता की, त्याची स्मृती अद्यापि मनांत कायम ठासून राहिली आहे. तो शुभ दिन आठवला की अजूनहि आपली दूर कार्य करण्याची स्फूर्ति निर्माण होते.

कार्यकर्त्यांच्या गुणांची दखल घेऊन त्यांना सिलम साहेब व्यक्तिशः शाबासकी देत. त्यामुळें कार्यकर्त्यांचा आत्मविश्वास वाढत असे आणि तो दुप्पट उत्साहानें पुढील कामाला लागत असे

श्री सिलमसाहेबांचें नांव उच्चारल्याबरोबर उंच असलेले, धारदार नाकाचे, पीळदार मिशांचे व भावदर्शी डोळे असलेले गृहस्थ आपल्या नजरेसमोर उभे रहातात. कोणावरही चटकन छाप पडेल असें त्यांचें रुबाबदार व्यक्तिमत्व आहे. त्यांच्या चेहेऱ्यावर जरासा करडेपणा दिसत तरी अंतःकरणानें अतिशय कोमल आणि वृत्तीनें संग्राहक म्हणून कार्यकर्त्यांत त्यांना मान आहे. त्यांच्या कामाचा उरक फार मोठा आहे. मुंबईत दारूबंदीचा जो मोठा कार्यक्रम पार पडायचा असे अशा वेळी कार्यकर्त्यांच्या अडचणी ते समजावून घेत
१७ आणि प्रत्येक बाबतीत त्यांना ते मार्गदर्शन करीत. मुंबई शहरात दारूबंदी क्षेत्रात जी निष्ठावंत माणसें काम करतांना दिसतात त्याचें फार मोठें श्रेय श्री. सयाजीराव सिलम यांच्या संग्राहकवृत्तीला आहे. एकदा निश्चय केला की, त्याला ते खंबीरपणें चिकटून राहत. ज्या समितीत सयाजीराव काम करतात त्या समितीचें काम निर्वेधपणे पार पडेल असा प्रत्येकाला विश्वास वाटतो. कितीहि मतभेद असले तरी त्यातून मार्ग काढण्याची वृत्ती त्यांच्यापाशी आहे. त्यामुळे सार्वजनिक क्षेत्रांत व निरनिराळ्या तऱ्हेची कामगिरी पार पाडतांना त्यांच्याबद्दल कुठेही विद्वेषाची भावना दिसून येत नाही. कुठल्याहि क्षेत्रांत त्यांनी कटुता निर्माण होऊं दिली नाही. सर्वांना सांभाळून घेऊन काम करण्याची त्यांची पद्धती असल्यामुळे कार्यकर्त्यांना ते नेहमीच एखाद्या दीपस्तंभाप्रमाणे मार्गदर्शक ठरले. सयाजीरावांचें सार्वजनिक जीवनाचें रहस्य यात्रांतच आहे. एकदा एखादें काम हातीं घेतलें की, मसत्या प्रतिष्ठेची कल्पना ते मनात बाळगीत नाहींत. कार्यकर्त्यांची सभा एखाद्या चाळीतील खोलीत जरी असली तरी ते सभेस जातील. कुठलाही कमीपणा ते कार्याच्या बाबतींत मनात आणीत नाहीत. त्यांनी एखादें कार्य हातीं घेतले की, त्याच्या प्राथमिक अवस्थेपासून तर ते पार पडेपर्यंत ते सतत मार्गदर्शन करतात. एवढे करून देखील ते स्वतःच्या कार्याचा कधी गाजावाजा करत नाहींत. प्रसिद्धीपासून ते अगदी अलिप्त राहिले आहेत. एकदा एखाद्या संस्थेची जबाबदारी अंगावर घेतल्यानंतर त्या संस्थेच्या बारीक सारीक तपशिलांत शिरून जेथे कुठे चुका होत असतील त्या दुरुस्त करण्यास ते स्वतः पुढे येत. चौपाटीवरील लोकमान्य टिळकांच्या स्मारकाबाबत श्री. सिलमसाहेबांनी जी कामगिरी बजावली ती फारच उल्लेखनीय आहे. चौपाटीवरील लोकमान्य टिळकांचा जो भव्य पुतळा उभा आहे तो श्री. सिलमसाहेब यांच्या चिकाटीचें एक प्रतीक आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाही. अशा या एका थोर लोकनेत्यास उदंड आयुष्य लाभो आणि त्याचें मार्गदर्शन आम्हांस सतत लाभत राहो, हीच या प्रसंगीं सर्वांची सदिच्छा.

---

# सभापति श्री. सयाजीराव सिलम

लेखक

श्री. एस्. आर. खराबे,
नायब सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ.

राज्यपुनर्रचनेनंतर नागपूरहून मुंबईला आल्यानंतर द्विभाषिक मुंबई राज्याच्या विधान सभेमध्ये माझें लक्ष एका व्यक्तीनें आपल्या प्रभावी व्यक्तिमत्वानें प्रकर्षानें आकर्षित करून घेतलें. पांढरा शुभ्र खादीचा पेहेराव, धोंधेमूद, उंच आणि दाट शरीरयष्टी, चष्म्यांतून दृष्टित होणारी भेदक नजर आणि पिळदार मिशा यांमुळें भरदार आणि रुबाबदार बनलेलें त्या व्यक्तीचें व्यक्तिमत्व कोणावरहि आपली छाप पाडील असेंच होतें. श्री. सयाजीराव सिलम हें त्या व्यक्तीचें नांव असल्याचें मला सांगण्यांत आलें. हें नांव पूर्वी नागपूरला असतांना फारसें कधीं ऐकल्याचें स्मरत नव्हतें. परंतु श्री. सिलम यांना प्रथमतः पाहतांक्षणींच माझ्या मनांत त्यांच्याविषयी नितांत आदराचीच भावना निर्माण झाली श्री. सिलम हे त्यावेळीं विधान सभेंतील कॉंग्रेस पक्षाचे मुख्य प्रतोद होते, परंतु त्या नात्यानें त्यांचा माझा संबंध फारच कमी आला.

नोव्हेंबर १९५६ मध्यें श्री. सिलम यांची द्विभाषिक मुंबई राज्य विधान सभेच्या अध्यक्षपदीं निवड झाली. आणि तेव्हांपासून त्यांचा आणि माझा विधान सभा सचिवालयीन कामाच्या निमित्तानें घनिष्ट संबंध येत गेला.

श्री. सिलम यांनीं अध्यक्षीय आसन विभूषित केल्यानंतर कोणत्या एका गोष्टीची जाणीव प्रत्येकाला प्रथमतः प्रभावित्वानें होत असेल तर ती याच गोष्टीची कीं, योग्य व्यक्ति आसनावर आरूढ झाली आहे. श्री. सिलम यांच्या प्रभावी व्यक्तिमत्वामुळें त्यांना अध्यक्षपदाच्या आसनामुळें शोभा प्राप्त झाली आहे कीं अध्यक्षपदाच्या त्या महान् आणि परम पवित्र आसनाला त्यांमुळें शोभा प्राप्त झाली आहे. असा विचार प्रेक्षकांच्या मनांत त्यावेळीं निर्माण झाल्यावांचून राहात नसे. विधान सभेचें कामकाज सुरूं होण्यापूर्वी सचिवांनीं त्यांच्या आगमनाची सूचना सभागृहाला दिल्यानंतर सर्व सभा निःशब्दपणें तटस्थ होऊन उभी राहात असे आणि श्री सिलम सभागृहात प्रविष्ट होऊन अध्यक्षीय आसनावर विराजमान झाल्यानंतर सभापति खऱ्या अर्थानें सभागृहांत उपस्थित झाले आहेत याची प्रचीति प्रत्येकाला आल्यावाचून राहात नसे. प्रभावी व्यक्तिमत्त्वाबरोबरच हुकमी दणकदार व धारदार आवाजाची आणि सुस्पष्ट शब्दोच्चारक्षमतेची देणगीहि श्री. सिलम यांना लाभली असल्यामुळें विधान सभेंत ते बोलत तेव्हां त्यांच्या मुखांतून बाहेर पडणारा प्रत्येक शब्द वजन-

दार वाटत असे आणि त्यांची शब्दांची फेक हटकून इष्टपरिणामकारी ठरत असे. परिणामतः प्रत्येक सदस्याला त्यांच्याविषयी एक प्रकारचा आदरयुक्त दरारा वाटत असे आणि त्यामुळे सभागृहाची शिस्त, शान आणि प्रतिष्ठा यांना त्यांच्या कारकीर्दीत कधीहि गालबोटदेखील लागलें नाहीं. उलट, विधान सभेच्या कामकाजाचें नियमन करण्याच्या त्यांच्या विशिष्ट पद्धतीमुळें विधान सभेच्या प्रतिष्ठेंत त्यांनीं बहुमोल भरच टाकली आणि उत्कृष्ट व उज्वल परंपरा आणि संकेत निर्माण करून आदर्श पायंडे पाडले असेंच कोणीहि म्हणेल. त्यांच्या अध्यक्षीय कारकीर्दीत त्यांची सत्वपरीक्षा पाहणारे प्रसंग कांहीं कमी आले नाहींत. किंबहुना, अध्यक्षपदाचें सुकाणू त्यांच्या हातीं आलें तेंच मुळीं अत्यंत आणीबाणीच्या आणि एक प्रकारच्या तंग परिस्थितींत आलें. त्या समयीं विधान सभेच्या बाहेर संयुक्त महाराष्ट्राचें आंदोलन सुरू होतें आणि त्याचे प्रतिसाद विधान सभेंत जोरदारपणें उमटविणाची संयुक्त महाराष्ट्र समितीच्या आमदारांची जिद्द विलक्षण प्रखर होती. या जिद्दीच्या पूर्तीर्थ त्यांच्या घणाघाती वक्तृत्वाच्या फैरीवर फैरी सभागृहात वारंवार झडत. आणि सरकार पक्षीय सभासदांकडूनहि त्याला यथायोग्य प्रत्युत्तर मिळाल्यावांचून रहात नसे. अशा परिस्थितींत, विधान सभेच्या दर्वी प्रशांत असलेल्या सागरामध्यें संतप्तपणाची तीव्रपणें घोंघावणारी वादळें निर्माण होण्याचे आणि उग्र घोषणांच्या प्रचंड उंचीच्या गगनभेदी लाटा उसळण्याचे प्रसंग अनेक वेळां उद्भवल्यास नवल नाहीं. ते प्रसंग इतके अटीतटीचे, गंभीर आणि अध्यक्षांची सत्वपरीक्षा पाहाणारे असत कीं, कोणीहि त्यामुळें डगमगूनच जावें परंतु एखाद्या कुशल कर्णधाराप्रमाणें श्री. सिलम यांनीं त्या प्रसंगांना अत्यंत धैर्यानें, करारीपणानें, दृढनिश्चयपूर्वक आणि मुख्यतः समयज्ञतेनें तोंड देऊन सभागृहाची शिस्त, शान आणि प्रतिष्ठा अत्यंत गौरवास्पद रीतीनें अभंग राखली, ही गोष्ट विरोधपक्षीयांसकट सर्वांनीं मुक्त मनानें मान्य केली आहे. इतकेंच नव्हे तर, सभागृहामधील त्यांच्या वर्तनांत, भाषणांत किंवा निर्णयांत पक्षपातीपणा औषधापुरतासुद्धा कोणालाहि कधीं आढळून आला नाहीं, हें देखील सर्वांनीं मनांत कोणत्याहि प्रकारचा किंतु न बाळगतां कबूल केलें आहे. प्रत्येक आणीबाणीच्या प्रसंगीं विचार आणि भावना यांचा समन्वय साधण्याचा पुरुषार्थ त्यांनीं साधला. लोकांच्या भावनेची कदर आणि कायद्याचा कठोरपणा यांचा समन्वय साधून कार्य केलें, असें विरोधी पक्षाच्या नेत्यांनीहि मोकळ्या मनानें मान्य केलें आहे.

सभापतित्वाच्या नात्यानें श्री. सिलम यांच्या व्यक्तिमत्वाच्या विविध पैलूंचें दर्शन सभासदांना झालें. विधान सभेमध्यें शिस्तपालनासाठीं आणि सभागृहाची प्रतिष्ठा अबाधित राखण्यासाठीं त्यांना कांहीं वेळां कडवेपणा धारण करावा लागला असला तरी एक निःस्पृह आणि निःपक्ष न्यायाधीश, मित्र आणि मार्गदर्शक अध्यक्षपदीं अधिष्ठित आहे असा सार्थ विश्वास सभागृहांतील प्रत्येक सभासदाला त्यांच्याबद्दल वाटत असे. श्री. सिलम हे कायद्याचे पदवीधर असले तरी माझ्या माहितीप्रमाणें वकिलीचा व्यवसाय त्यांनीं कधीं केला नाहीं. तथापि, सभागृहांत मतभेदांचे प्रसंग निर्माण झाले असतांना किंवा गुंतागुंतीचे

औचित्य प्रश्न उपस्थित झाले असतांना त्यांनी जे निर्णय दिले त्यामुळें त्यांच्या ठिकाणीं उच्च दर्जाच्या न्यायाधीशाचे गुण वसत असल्याची प्रचीति प्रत्येकाला येत असे. त्यांच्या निर्णयांतून निःपक्षपातीपणा आणि निःस्पृहपणा तर प्रत्येकाच्या प्रत्ययाला येईच, परंतु त्यांच्या ठिकाणीं वसत असलेल्या कायद्याच्या सूक्ष्म दृष्टीचाहि प्रत्यय आल्यावांचून राहात नसे.

विधान सभेचा सदस्य या नात्यानें सभासदांनीं सभागृहांत कसें वागावें, कसें बोलावें आणि बोलण्यापूर्वी कशी पूर्वतयारी व अभ्यास करावा, सभासदांचे विशेषाधिकार आणि कर्तव्यें काय आहेत आणि त्यांची त्यांनीं अनुक्रमें अंमलबजावणी आणि पालन कसें करावें यावाबत त्यांचें जें मार्गदर्शन सभासदांना वेळोवेळीं लाभलें तें निःसंशय बहुमोल होतें आणि त्याचा उपयोग सभासदांना त्यांच्या भावी संसदीय जीवनक्रमांत लोकशाही-प्रणालीच्या पुष्टीसाठीं मुक्तद्वाराप्रमाणें झाल्याशिवाय राहाणार नाहीं.

श्री. सिलम यांच्या ठिकाणच्या मिश्किलपणाच्या गुणांचें दर्शन सभासदांना सभागृहांत क्वचितच होत असे, असे मी म्हटल्यास सत्यापलाप होणार नाहीं असें वाटतें. विविध क्षेत्रांतील दुमारें चाळीस वर्षांच्या प्रदीर्घ आणि अखंड सार्वजनिक सेवेच्या तपश्चर्येमुळें सर्वांना संभाळून घेऊन चालण्याचा गुण त्यांच्या ठिकाणीं असला तरी त्यांचें व्यक्तिमत्त्व वरकरणी तरी प्रखरच वाटतें हें नाकबूल करण्यांत अर्थ नाहीं. अर्थात् सूर्याचें एक नांव "मित्र" आहे आणि सूर्याच्या ठायींचा प्रखरपणाचा गुण श्री. सिलम यांच्या ठायींदेखील सभागृहांत प्रकट होत असे या दृष्टीनें त्यांना मित्र म्हणतां येईल. त्यांचा वरकरणी उग्र वाटणारा चेहरा आणि मिशा पाहिल्यानंतर आपल्याला प्रथम त्यांची फार भीति वाटली असल्याचें आणि त्यामुळें विधानसभेच्या प्रथम अधिवेशनांत त्यांच्या चेंबरकडे फिरकलोहि नसल्याचें विरोधी पक्षाच्या एका प्रमुख सभासदानें स्वतः सभागृहांतच सांगितलें. हें सर्व जरी तथ्यपूर्ण असलें तरी मिश्किलपणाच्या आपल्या ज्या सर्वसाधारण कल्पना असतात, त्यांचें प्रत्यंतरहि श्री. सिलम यांच्या ठिकाणीं सर्व सभासदांना पूर्णांशानें आलें आहे. पण तें सभागृहांत नव्हे तर तें अध्यक्षांच्या चेंबरमध्यें आणि समित्यांच्या बैठकांच्या वेळीं. विशेषतः त्यांच्या चेंबरमध्यें कोणी सभासद गेला तर त्याचें स्वागत ज्या आपलेपणानें आणि आस्थेनिक मोकळेपणानें त्यांच्याकडून होत असे, त्यामुळें सभागृहांतले अध्यक्ष ते हेच कां असा संभ्रम क्षणभर सभासदांच्या मनांत निर्माण झाल्यास नवल वाटावयास नको. परंतु संभाषणाच्या भरांत श्री. सिलम यांनीं केलेला नर्मविनोद, त्याचे दिलखुलास खळाळणारें हास्य, सौजन्य आणि अभावितपणें प्रत्ययास येणारा हृदयाचा कोमलपणा यांच्या महापुरांत सभासदांच्या मनांतील संभ्रम, भीती आणि धास्ती कोठल्या कोठें लोपून जात असे. आणि मग अध्यक्ष आणि सभासद एकमेकांसमोर बसले नसून दोन जीवश्चकंठश्च मित्र जणूं एकमेकांसमोर बसले आहेत असें पाहाणारास वाटे. त्यामुळें सभासदांना आपल्या अडीअडचणी आणि

शंकाकुशंका निःसंकोचपणें अध्यक्षांसमोर मांडतां येऊन त्यांच्याकडून त्यांचे निःशेष निरसन करून घेतां येत असे. अशावेळी श्री. सिलम यांचे व्यक्तिमत्त्व नारिकेल फणसाप्रमाणें किंवा अननसाप्रमाणें आहे अशी कल्पना सभासदांच्या मनाला चाटून गेल्यास आश्चर्य नाहीं. वरून खरखरीत, परंतु आंतून मधुर आणि शीतल!

सभागृहांत श्री. सिलम यांच्या ठिकाणचा आणखी एक विरळ आणि मौल्यवान गुण नेहमी प्रत्ययाला येई. विशेषतः द्विभाषिक मुंबई राज्य अस्तित्वांत असतांना त्यांच्या ठिकाणच्या या गुणाचें महत्त्व मनाला विशेषत्वानें जाणवत असे. हा गुण म्हणजे त्यांच्या ठिकाणचें बहुभाषाप्रभुत्व होय. इंग्रजी, मराठी, हिंदी आणि गुजराती या भाषांचा वापर सारख्याच कौशल्यानें, सहजतेनें, सफाईनें आणि आत्मीयतेनें करतांना त्यांना पाहिलें म्हणजे मन थक्क होऊन जात असे आणि त्यांच्याविषयी वाटणाऱ्या आदरांत भर पडत असे. सभासद ज्या भाषेंत बोलत असेल त्याच भाषेचा वापर अध्यक्षानेंहि केला म्हणजे अध्यक्ष आणि सभासद यांच्यामध्यें जो आपुलकीचा आणि जिव्हाळ्याचा रेशमी दुवा निर्माण होतो, त्यामुळें सभागृहाचें कामकाज सुरळितपणें चालण्यास निःसंशय बहुमोल सहाय्य होतें. त्या दृष्टीनें श्री. सिलम यांच्या ठिकाणचा बहुभाषाप्रभुत्वाचा गुण अतिशय मोलाचा म्हटला पाहिजे.

श्री. सिलम यांची अभ्यास् वृत्ति देखील कोणाच्याहि चटकन् लक्षांत येण्यासारखी आणि अतिशय वाखाणण्यासारखी आहे. विधान सभा सचिवालयाचें काम पाहतांना समोर आलेल्या वस्त्याचें (फाइल्स) अत्यंत सूक्ष्म दृष्टीनें अध्ययन व परिशीलन केल्यानंतर आणि आवश्यकतेनुसार त्यासंबंधीं सचिवांशीं सखोल आणि सर्वांगीण चर्चा केल्यानंतरच ते आपणांला योग्य वाटेल तो निर्णय घेत. त्यामुळें सचिवालयास सदैव दक्ष आणि जागरुक राहून अत्यंत काळजीपूर्वक टिप्पणी (नोटिंग) करावी लागत असे. विधान सभेच्या अधिवेशनाच्या धाईगर्दीतहि ते आपला हा स्वभाव सोडीत नसत. विधान सभेचें अधिवेशन चालू असतांना, प्रश्नोत्तरांचा तास संपल्यानंतर, सभागृहासमोर काहीं गुंतागुंतीचा व वादग्रस्त मुद्दा उपस्थित होण्याची शक्यता नाहीं हें पाहून, ते आपल्या चेंबरमध्यें येऊन बसत आणि तेथें महत्त्वाच्या व तातडीच्या वस्त्यां (फाईल्स) बाबत निर्णय घेणशाचा आणि सदस्यांशीं व पक्षप्रतोदाशीं विचारविनिमय करीत राहाण्याचा त्यांचा परिपाठ होता. ते चेंबरमध्यें असतांना सचिवांनाहि तेथें जाऊन पुष्कळशा वस्त्यांचे निकाल सदस्यांशीं व प्रतोदाशीं विचारविनिमय करून अध्यक्षाच्या आदेशानुसार करवून घ्यावे लागत असत. ह्यावेळीं अध्यक्ष, सचिव, प्रतोद व सभासद यांच्यामध्यें नेहमीं खेळीमेळीचें वातावरण राहात असे व तें पाहून कोणासहि अचंबा वाटल्याशिवाय राहात नसे. अर्थात् याचें श्रेय श्री. सिलम यांच्याप्रमाणेंच विधान सभेचे सचिव श्री. श्रीनिवासराव बेळवडी यांनाहि आहेच.

अध्यक्ष या नात्यानें श्री. सिलम यांची आणखी जी बहुमोल कामगिरी मला पाहावयास मिळाली ती अध्यक्षांच्या वार्षिक परिषदांतून होय. या परिषदांसाठीं

श्री. सिलम, श्री. पागे व श्री. बेळवडी यांच्याबरोबर मलाहि उपस्थित राहण्याचे प्रसंग येत असत. परिषदेपुढील कोणत्याहि महत्त्वाच्या मुद्यावर महाराष्ट्राचे श्री. सिलम किंवा श्री. पागे बोलले नाहीत असें कधींच झालें नाहीं. परिषदेपुढें महाराष्ट्राच्या दृष्टिकोनाची दीपज्योत या दोघांनीं नेहमीं तेवत ठेवली असेंच म्हणावें लागेल. श्री. सिलम यांनीं एखादा मुद्दा हातीं घेतल्यानंतर तो त्यांनीं मध्येंच सहजासहजीं सोडल्याचें निदान मला तरी आठवत नाहीं. एखादा मुद्दा मनाला पटला आणि तो हातीं घेतला म्हणजे त्याचा शेवटपर्यंत चिकाटीनें पाठपुरावा करीत राहण्याचा त्यांचा स्वभाव आहे. आणि तो प्रशंसनीय नाहीं असें कोण म्हणेल ?

श्री. सिलम यांच्या कारकीर्दीत आणखी जी एक महत्त्वाची गोष्ट वस्तुतः ऐतिहासिक महत्त्वाची गोष्ट घडली—ती म्हणजे संविधानाच्या कलम १८७ अनुसार या राज्याचे स्वतंत्र सचिवालय अस्तित्वांत येऊन तेथील अधिकारीवर्गास शासकीय सचिवालयांतील अधिकारीवर्गाचा दर्जा देण्यांत आला. हें कार्य श्री. सिलम यांनीं ज्या नैपुण्यानें केलें तें निःसंशय अविस्मरणीय आहे, अर्थात् या कामीं आपल्या राज्याचे लोकाभिमुख अतएव लोकप्रिय आणि पुरोगामी मुख्य मंत्री श्री. यशवंतरावजी चव्हाण यांचें अमोल सहकार्य आणि साथ त्यांना लाभली हें विसरून कसें चालेल ?

१९५७ सालापासून आमदारांना आणि इतरांनाहि अत्यंत उपयोगी पडेल असें अभ्यासनीय साहित्य निर्माण करण्याचा जो नाविन्यपूर्ण उपक्रम महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालयामार्फत करण्यांत आला त्याची प्रेरणा श्री. सिलम यांच्याकडून मिळाली.

महाराष्ट्र राज्यस्थापनेनंतर श्री. सिलम यांनीं आपल्या अध्यक्षीय कारकीर्दीत एक अतिशय मोलाची आणि चिरस्मरणीय अशी कामगिरी करून ठेवली आहे. ती म्हणजे विधान सभेमध्यें बोलतांना जे विशिष्ट संसदीय शब्द किंवा शब्दसमूह प्रायः उपयोगांत येतात, त्यांच्या मराठी प्रतिशब्दांचा कोश तयार करणें ही होय. त्यामुळें इंग्रजीचा वापर ज्यांना बुद्ध्या करावयाचा नाहीं किंवा तो करणें ज्यांना सहजतेनें शक्य होत नाहीं, त्याची तर फार मोठी सोय झाली आहेच, परंतु विधान सभेची कार्यवाही संपूर्णतः मराठींतून चालविण्याचें आपलें स्वप्न त्यामुळें साकार होणार आहे.

शेवटीं श्री. सिलम यांच्या वाढदिवसाच्या शुभ प्रसंगीं त्यांना प्रदीर्घायुरारोग्य लाभो आणि त्यांच्या हातून उत्तरोत्तर अधिकाधिक उज्ज्वल लोकसेवा यापुढेंहि घडत राहो अशी मी परमेश्वराजवळ प्रार्थना करतो.

---

# सभागृहाची प्रतिष्ठा वृद्धिंगत करणारा सभापति

लेखक
श्री. महेश जोशी

राज्यसरकार आणि विधान सभा यांच्या संबंधांत सलोखा आणि सुरळितपणा ठेवणारी घटनामान्य व्यक्ति म्हणजे सभापति होय. पण दुर्दैव असे की, १९५० साली भारताची राज्य घटना अंमलांत आल्यानंतरहि माजी मुंबई राज्याच्या विधान सभेत सभापतीला आपले स्वतःचे स्वायत्त आणि घटनाविहित सचिवालय सुमारे ९ वर्षे प्राप्त होऊं शकले नाहीं. पश्चातीत अशा सभापतीपदाच्या कार्याची यंत्रणा राज्यसरकारच्या विधि-खात्याची एक दुय्यम दर्जाची शाखा होती. त्यामुळें १९५७ साली श्रीयुत सयाजीराव सिलम यांनीं जेव्हां सभापतिपदाची सूत्रें आपल्या हातीं घेतलीं, तेव्हां राज्यसरकारच्या अंकित असलेले आपले मोडकेतोडके सचिवालय स्वायत्त आणि सुव्यवस्थित करण्याची अत्यंत निकडीची गरज आहे, हें त्यांच्या तात्काळ ध्यानांत आलें.

साहजिकच आपल्या कारकीर्दीच्या सुरवातीपासूनच विधानसभेचे सचिवालय स्वायत्त आणि सुव्यवस्थित करण्याच्या कार्यावर त्यांनीं आपलें सर्व लक्ष केंद्रित केलें. सातत्यानें आणि चिकाटीनें वाटाघाटी आणि विचारविनिमय करून अवघ्या दोन वर्षांच्या काळात सिलमसाहेबांनीं राज्यविधानसभेला स्वायत्त सचिवालयाची जोड घालून दिली. वास्तविक, विधानसभेला स्वायत्त सचिवालयाचें किती आणि कसें महत्त्व वाटते हें विरोधी पक्षाच्या गोटांत शिरल्याशिवाय पुरेसे कळत नाहीं. राज्यकारभाराविषयीं आमदारांकडून वेळोवेळीं विचारले जाणारे प्रश्न, उपस्थित केले जाणारे काम, तहकुबीचे ठराव, वेळ प्रसंगीं अचानक पुढे येणारे सभागृहाच्या प्रतिष्ठाभंगाचे मुद्दे सरकारपक्षाच्या नियमबाह्य किंवा सभागृहाच्या सर्वसाधारण अधिकारक्षेत्रावर अतिक्रामक ठरणाऱ्या वर्तनावर करडी नजर ठेवण्याच्या मागण्या या विषयीं निर्णय देण्याच्या वेळी स्वायत्त सचिवा-लयाची महति केवळ विरोधी पक्षालाच नव्हें तर सरकार पक्षालाहि पटल्याविना राहिलेली नाहीं. पण याहिपेक्षा स्वायत्त सचिवालयाची खरी महति दिसून आली ती, 'एस्टिमेट कमिटी' आणि 'पब्लिक अकाऊन्टस कमिटी' यांचे अध्यक्षपद अर्थसंग्याकडून काढून "नॉनऑफिशिअल" सभासदाकडे देण्याच्या प्रयत्नांत. या प्रयत्नाला तत्कालिन द्विभाषिक राज्याचे मुख्य मंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांनीं पुरेसा पाठिंबा दिला म्हणून तो प्रयत्न यशस्वी झाला हें खरें असलें तरी मुळांत सभापति श्री. सिलम यांनीं आपल्या स्वायत्त सचिवालयाच्या सहाय्यानें तो विषय नेटानें, चिकाटीनें आणि काहींशा चातुर्यानेंच धसास लावला हें विसरतां येणार नाहीं. अशा रीतीनें सिलमसाहेबांनीं विधान सभेच्या

स्वायत्त सचिवालयापासून सभागृहाच्या दोन्ही अर्थसमितींच्या अध्यक्षपदांची सरकारी दडपणांतून मुक्तता करण्यापर्यंत आवश्यक पण मागें पडलेली कामें हातावेगळीं केलीं. सिलमसाहेबांचें हें कार्य महाराष्ट्र राज्य विधानसभेच्या पूर्वेतिहासांत अक्षरशः सुवर्णाक्षरांनीं नमूद व्हावयास हवें.

आणि विशेष उल्लेखनीय गोष्ट ही कीं, हा सर्व प्रयत्न अत्यंत समजुतीनें आणि कोणताहि गाजावाज न करतां होऊन गेला. सिलमसाहेबांच्या कार्यपद्धतीचें हें एक नमुनेदार उदाहरण होय. त्यांची शांत गंभीर वृत्ति, सर्वांचें ऐकून घेण्याची तयारी, कोणत्याहि गोष्टीचा दूरगामी परिणाम जाणण्याची शक्ति आणि अकारण हट्टाला न पेटण्याची सावधगिरी या सार्वजनिक कार्यकर्त्यांत अलिकडे बव्हंशीं दुर्मिळ होत चाललेल्या गुणांमुळें त्यांची सभापतिपदाची कारकीर्द विधानसभेच्या कार्यकर्तृत्वाला नवें क्षेत्र उपलब्ध करून देणारी ठरली, असेंच म्हणावें लागेल. विशेषतः सभागृहाबाहेर द्विभाषिक राज्याविषयींचा असंतोष वारंवार खदखदून उफाळून वर येत असतांना आणि त्या असंतोषाचे तितकेच उग्रदर्शक पडसाद सभागृहांत उमटत असतांना आपली, आपल्या पदाची आणि त्या द्वारे सभागृहाची आणि संपूर्ण राज्याची प्रतिष्ठा अबाधित राखणें ही भल्याभल्यांची कसोटी घेऊं शकणारी गोष्ट होती, पण सिलमसाहेबांनीं या बाबतींत सर्व विघ्नसंतोषी चळवळ्यांचा अनपेक्षित अपेक्षाभंग केला.

सिलमसाहेब हे १९५७ ते १९६२ या काळांतील मुंबई विधानसभेचे अजातशत्रु सभापति होते, ही फार अर्थपूर्ण घटना होय. या काळांत ज्याला शत्रु नाहीं असा राजकीय कार्यकर्ता सांपडणें ही प्रायः अशक्य कोटींतली गोष्ट होऊन बसलेली होती. दुसऱ्याची सदिच्छा आणि सद्भावना प्रामाणिक आहे हे मानावयास कोणी तयारच नव्हे. अशा काळीं आपल्या निर्भीड, निःस्वार्थ आणि निरहंकार स्वभावानें सत्तारूढ आणि सत्ताविरोधी पक्षांत स्वतःला आदराचें आणि मानाचें स्थान त्यांनीं संपादन केलें. चाळीस वर्षांचा सामाजिक कार्याचा अनुभव पाठीशीं असल्यामुळेंच हें असाधारण कर्तृत्व ते दाखवूं शकले. अर्थात् सभापतिपदाची प्रतिष्ठा आणि सभागृहाची उपयुक्तता हीं दोन्हीं त्या अत्यंत खळबळीच्या आणि धामधुमीच्या काळखंडांतहि सर्वस्वी अबाधित राहिलीं. इतकेंच नव्हे तर कांहीं अंशीं हीं दोन्हीं उजळून निघालीं. उठल्यासुटल्या सभापतिपदाची अप्रतिष्ठा होत असल्याचीं उदाहरणें देशांत घडोघडीं दिसत असतां या राज्यांत असा एकहि आततायी प्रसंग घडल्याचें आढळत नाहीं. विरोधी पक्षाचा समजुतदारपणा हा जेवढा त्यास कारणीभूत आहे, तेवढाच सभापतींचा समयोचित निर्भीडपणाही कारणीभूत आहे.

विरोधी पक्ष आणि सत्तारूढ पक्ष यांमधील वैमनस्याचा परिपाक हुतेरपर्यंत ताणण्याइतपत कधीं झालाच नाहीं हें सभापति, विरोधी पक्ष आणि सत्तारूढ पक्ष या सर्वांनाच भूषणावह होय यांत शंका नाहीं. अर्थात् त्याचें श्रेयहि या तिन्हीं घटकांना आहे.

सिलम साहेब हे मुंबईच्या सामाजिक आणि राजकीय जीवनांत वाढलेले आणि मान्यता पावलेले कार्यकर्ते होत. तरीहि ग्रामीण महाराष्ट्रांतून निवडून येणाऱ्या लोकप्रतिनिधींना ते ' आपलेच साहेब आहेत ' असे सदैव वाटे, अशी आपुलकी वाटत असली तरी हे लोकप्रतिनिधि त्यांच्याशी कधींच गैरवाजवी सलगी करूं शकले नाहींत. कारण सिलमसाहेबांची करडी चेहेरेपट्टी, त्यांचा आंकडेबाज मिशा आणि खणखणीत आवाज यांच्या योगानें त्यांच्याविषयीं प्रथमदर्शनींच दरारा वाटूं लागतो. हा दरारा परिचयानें कमी होण्याऐवजीं वाढतच जातो. कारण, सिलमसाहेबांची नियमप्रेमी वृत्ति !

विधानसभेचें कामकाज जवळून पाहून त्यांचा वार्ता आणि वार्तापत्रें लिहिणाऱ्या वार्ताहरांशीं सिलमसाहेबांचे संबंध अत्यंत मित्रत्वाचे होते. सभागृहाच्या विशेषाधिकारांना अधिक्षेप नकळत होण्यासारखे प्रसंग अनेक उद्भवले. इंग्लण्डच्या राणीसाहेब द्वितीय एलिझाबेथ या ज्यावेळीं हिंदुस्थानात आल्या त्यावेळीं महाराष्ट्र राज्याच्या वतीनें जी भेट देण्यांत आली त्या भेटीत एक नथहि होती. या नथीसंबंधीं जीं प्रश्नोत्तरें सभागृहांत झालीं तीं सिलमसाहेबांनीं ठरविलेलीं असतांनासुद्धां वृत्तपत्रांत झळकलीं. याबाबत सभापति वृत्तपत्रांना कडक इशारा देऊं शकले असते, पण त्याऐवजीं त्यांनीं विधान सभा-वार्ताहरांची अनौपचारिक बैठक घेऊन त्यांना झालेल्या प्रमादांची जाणीव सौम्य रीतीनें करून दिली ! विधान सभा आणि वृत्तपत्रें यांचे संबंध जिव्हाळ्याचे राहाण्याचे दृष्टीनें परस्परांनीं एकमेकांच्या विशेषाधिकारांचा आदर आणि मान ठेवला पाहिजे. सभापति श्री. सिलम यांनीं आपल्या कारकीर्दींत वृत्तपत्रांशीं जे संबंध ठेवले ते याच जाणीवेनें. त्यामुळें वृत्तपत्रें आणि विधानसभा यांचे संबंध सदैव निकोप राहिले.

सिलमसाहेबांच्या स्नेहाचा लाभ मला जो झाला तो एक विधानसभा-वार्ताहर या नात्यानेंच. कोणतीहि अडचण वार्ताहरांना जाणवली की ते मोकळ्या मनानें सिलमसाहेबांपाशीं जात, तसाच मीहि जाई. वार्ताहर या नात्यानें माझा आजवर अनेक थोरामोठ्यांशीं दूरजवळचा संबंध आलेला आहे. पण महत्पदीं चढल्यानंतरही निरहंकार आणि अनाग्रही वृत्तीनें लहानांशींहि वागणारी फारच थोडीं माणसें मीं पाहिलीं आहेत. अशा मोजक्याच माणसांपैकीं सिलमसाहेब हे आहेत. मला त्यांचा लोभ लाभला हें कृतज्ञतेनें नमूद करावेसें वाटतें.

सिलमसाहेब यांच्या ठायीं जे कर्तृत्व आहे तें देशाच्या हितार्थ अधिकाधिक कारणीं लागलें पाहिजे, असें त्यांचा एक चाहता या नात्यानें मला वारंवार वाटतें. अशी संधि त्यांना मिळून त्यांच्या हातून पूर्वीपेक्षां अधिक मोलाचीं कामें होवोत अशी सर्वांप्रमाणे माझीहि इच्छा आहे. पण मुंबई आणि महाराष्ट्र राज्यविधानसभेच्या सभापतिपदावर आरूढ झाल्यानंतर त्यांनीं केलेलें कार्य विधानसभेच्या इतिहासांत अजोड राहील यांत शंका नाहीं. महाराष्ट्र विधान सभेचें स्वायत्त सचिवालय हेंच त्यांच्या कर्तृत्वाचें खरेखुरें आणि स्थायी स्मारक होय.

---

# सिलम म्हणजे सेवा, शील आणि शिस्त यांचा त्रिवेणी संगम

लेखक :
त्र्यं. शि. भारदे,
*सभापति, महाराष्ट्र राज्यविधानसभा*

श्री. सिलमसाहेबांचा व माझा परिचय मी ५२ साली मुंबई विधानसभेचा सदस्य म्हणून निवडून आलो त्यावेळी झाला. मुंबई विधानसभेतील काँग्रेस पक्षाचे मुख्य प्रतोद म्हणून श्री. सिलम काम करीत होते. त्यावेळीच त्यांची कार्यक्षमता, एकाग्रता आणि संघटनकुशलता इत्यादि त्यांच्या गुणांचा प्रत्यय आला. कुठलेंहि काम प्रामाणिकपणानें व आपलें सर्व लक्ष केंद्रित करून करावयाचे आणि ते करताना कार्यक्षमतेच्या बाबतींतही प्रभावी काम करावयाचे असा त्यांचा बाणा! एकाग्रता, दक्षता व कार्यक्षमता यांचा त्रिवेणी संगमच त्यांच्या कार्यांत दिसे.

## यशस्वी पक्षप्रतोद

मुख्य प्रतोद या नात्यानें सभागृहांत सावध्यानें व जागरूकतेनें हजर रहाणें, सभागृहातील कामकाजाचा पूर्ण आढावा घेणें त्याच्या अनुषंगानें कोणत्या सभासदानें केव्हां व कसें बोलावे यासंबंधी सूचना देणें, मंत्र्यांना व संबंधित सभासदांना सभागृहांतील कामकाजाबद्दल दक्ष ठेवणें, पक्षापक्षांचें वैधानिक पवित्रे जाणून आपल्या पक्षाचे त्या त्या बैठकीतील धोरण ठरविणें, सदस्यांनाहि पक्षशिस्तीची जाणीव करून देणें आणि एकंदरीनें आपल्या पक्षाची प्रतिष्ठा व प्रभाव वैधानिक कामकाजांत कसा वाढेल यासाठीं प्रयत्नांची शिकस्त करणें अशा सर्व प्रयत्नांमुळें एक निष्ठावान व कर्तबगार मुख्य प्रतोद असा लौकिक श्री. सिलमसाहेब संपादू शकले.

## कसोटीचे व सचोटीचे सभापति :

या वैधानिक कामकाजाच्या सूक्ष्म अवलोकनानें. आणि प्रत्यक्ष नेतृत्वाच्या अनुभवानें यशस्वी सभापति बनण्याची पूर्वतयारीच जणु त्यांनीं सिद्ध केली. मुंबई विधान सभेचें सभापतिपद भूषविण्याचा मान श्री. सिलम यांना १९५७ साली मिळाला. हा काळ मुंबई राज्याच्या इतिहासांत क्रांतिकारक काळ मानला जाईल. मुंबई राज्याचे विभाजन व्हावे आणि संयुक्त महाराष्ट्र निर्माण व्हावा यासाठीं प्रक्षोभक जनआंदोलन सुरू होते. निदानपक्षी विशाल द्वैभाषिकाच्या प्रस्थापनेनें या प्रक्षोभाचें शमन होऊन राजकारण व लोककारण सुधारेल या भरवशानें विशाल मुंबईराज्य प्रस्थापित झालें होतें. निवडणुका झाल्या. महाराष्ट्रांत काँग्रेस उमेदवारांचा मोठ्या प्रमाणांत पराभव झाला. संयुक्त महाराष्ट्र समितीच्या नेतृत्वाखालीं या जनआंदोलनाची धार वाढविणारे बरेच उमेदवार विधानसभेंत निवडून

आले. विधान सभेचें कार्य वैधानिक असलें तरी पार्श्वभूमि आंदोलनाची होती. पक्षोपक्षीय मताच्या विभाजनाच्या नेहमींच्या वैधानिक कामकाजापेक्षां राज्याच्या विभाजनाच्याच प्रश्नाची छाया सभागृहावर होती. आव्हान प्रतिआव्हान, निषेध प्रतिनिषेध या गोष्टींमुळें वातावरणांत खळबळ होती. अशा कठीण काळांत श्री. सिलम यांना सभापतिपद देण्यांत आलें. या पदाचा योग म्हणजे आपदांचा भोग असें चित्र होतें. अशा प्रतिकूल परिस्थितीं-तहि कार्यकुशलतेनें, निर्धारानें, निःपक्षपातीपणानें, समयसूचकतेनें व एकंदर मोठ्या इभ्रतीनें श्री. सिलम यांनीं आपली सभापतित्वाची कारकीर्द यशस्वी करुन दाखविली हें अत्यंत गौरवास्पद आहे.

## प्रभावी व्यक्तिमत्व !

पिळदार मिशांमुळें, सुदृढ बांध्यामुळें आणि करड्या आवाजामुळें त्यांच्या व्यक्तित्वा-बद्दलचा आदरपूर्ण दबदबा हा तात्काळ कोणाच्याहि अनुभवास येण्याजोगा होता. परंतु त्याबरोबरच त्यांच्या मनाचा प्रेमळपणा, कार्याची निष्ठा, लोकांची कदर, निर्णयाचा समतोल इत्यादि गुणांचाहि प्रत्यय त्यांच्या सहवासांत व कार्यांत अनुभवास येई.

मिशांत पीळ आहे पण मनांत पिळाचा लवलेशहि नाही, आवाज करडा आहे पण हृदयांत कठोरतेचा अंशहि नाहीं, शिस्त कडक आहे पण भिस्त मात्र लोकसहकार्यावर आहे, पक्षाची निष्ठा जाज्वल्य आहे पण निःपक्ष सभापतित्वाची प्रतिष्ठा सुरक्षित आहे, मनोभावें आव्हान आहे पण संयमाचें भान आहे. आणि महत्पदाचा मान आहे पण कर्तव्याचें इमान आहे असें सिलमसाहेबांचें व्यक्तिमत्व सर्वांच्या प्रत्ययास आलें. मुंबई राज्याचें विभाजन झाल्यानंतर संयुक्त महाराष्ट्र निर्माण झाला या संयुक्त महाराष्ट्राचे पहिले सभापति रहाण्याचा मान श्री. सिलम यांना लाभला हें यथोचितच होतें. त्यांना अनेक भाषांचें असलेलें ज्ञान, कार्यकर्ता या नात्यानें पक्षकार्यकर्त्यांच्या वृत्तिकार्याची कल्पना आणि कार्यदक्षता या गोष्टींमुळें सभापतिपदाची कारकीर्द यशस्वी करुन दाखविणें त्यांना सहज शक्य झालें.

श्री. सिलम यांनीं अनेक स्थानें भूषविलीं व अनेक क्षेत्रांत त्यांनीं आपल्या व्यक्तित्वाचा ठसा उमटविला. आणि म्हणूनच लोकसेवक या नात्यानें त्यांच्या व्यक्तित्वाकडे पहाणें अधिक आकर्षक आहे. समाजशिक्षणाचें कार्य असो वा नशाबंदीचें कार्य असो समाज सुशिक्षित व संस्कारित व्हावा या एकाच तळमळीनें श्री. सिलम यांनीं आपलें शक्तिसर्वस्व पणाला लावून या कार्यांचा प्रभाव सर्वदूर पाडण्याच्या कामीं मोठे यश मिळविलें. दोन वेळां मुंबई महापालिकेत सातत्यानें व कुलस्यादि मतदारसंघांतून केवळ सेवाकार्यावर आधारलेल्या लोकप्रियतेच्या आधारें निवडून येणें ही एकच गोष्ट श्री. सिलम यांचें वैशिष्ट्य सिद्ध करण्यास पुरेशी आहे.

आतां ते पांदेचरीला नायब राज्यपाल म्हणून काम करीत आहेत. पांदेचरी म्हणजे श्री अरविंदांची तपोभूमि ! या तपोभूमींत श्री. सिलम यांच्या सेवाधर्माला नवस्फूर्ति मिळो व त्यांना दीर्घायुरारोग्य लाभून त्यांच्या हातून प्रभावी जनसेवा घडो हीच प्रार्थना ।

---

# महाराष्ट्र विधानसभा के सर्व-प्रथम अध्यक्ष

लेखक

व्ही. एस्. काटे

मान्यवर श्री. सयाजीराव लक्ष्मण सिलम के सम्बन्ध में लिखने का अवसर प्राप्त होना मैं अपना सौभाग्य समझता हूँ। सदी की तीन किस्तों में से दूसरी किस्त, अर्थात् उनकी ७० वीं वर्ष-गाँठ पर अभिनंदन स्मृति-ग्रंथ प्रकाशित हो रहा है यह अत्यंत उचित ही है। प्रारम्भ में बम्बई विधानसभा का एवं पश्चात् महाराष्ट्र विधान सभा का अध्यक्ष-पद यद्यपि वे ५ वर्ष से अधिक समय तक (१९५६ से १९६२) विभूषित करते रहते है, तथापि व्यक्तिगत रूप से महाराष्ट्र विधान-सभा के नागपुर के प्रथम सत्र से अर्थात् नवंबर १९६० से लेकर मेरा सहवास होने के कारण तदनंतर की ही बातें मैं यहाँ कह सकूँगा।

प्रारम्भ में ही जो बात उनके सम्बन्ध में ध्यान खींचती है वह उनका निरतिशय सौजन्य है। जैसा कि उनके विदाई के समय में सदन के एक प्रमुख विरोधी सदस्य कह रहे थे। प्रथम दर्शन में उनका भव्य शरीर तथा विशाल मूँछों के कारण कुछ उग्र सा लगनेवाला उनका चेहरा अचानक निर्मल हंसी फूट पड़ने पर कैसा लुभावना लगता है इसका अनुभव कितनों ही ने किया होगा। उन्हीं सदस्य ने आगे चल कर यह भी कहा था कि यद्यपि १९५७ के प्रथम सत्र में वे उनके कक्ष में प्रवेश करने का साहस नहीं कर सकते थे। तथापि एक बार सम्मुख परिचय प्राप्त करने पर वे उनसे कुछ हिलमिल से गये और अपने सदस्यत्व में उनसे बहुत कुछ मार्गदर्शन पाया जिससे कि उक्त सदस्य का ५ वर्ष का कर्तव्य सुचारू रूप से निभाया गया। उनका यह सौजन्य विशेष कर लेखा समिति तथा प्राक्कलन समिति के स्वागत में उनके निवास पर आयोजित भोज गोष्ठियों में घरेलू ढंग पर हास-परिहासों में विशेष रूप से प्रकट हुआ है।

अधीन कर्मचारियों के बारे में उनकी आस्था विशेष स्मरणीय है। विधान मंडल सचिवालय के कर्मचारियों को कितना कठिन तथा तीव्र कार्यभार वहन करना पड़ता है। इसका सुस्पष्ट संवेदन होने के कारण प्रत्येक सत्र समाप्ति पर वे जिस सहृदयता से हम लोगो की पूछताछ किया थे वह वास्तव में अविस्मरणीय है।

इसका उन्हें यथार्थ अधिगम होने के कारण स्नेह सम्मेलन कि अवसरों पर तथा नित्य नैमित्तिक रूप में भी कर्मचारियों के मनोविनोद की पूरी व्यवस्था हो इसकी ओर भी ध्यान देने का यत्न उन्होंने किया। विशेष कर अपने निजी सहायक तथा अन्य कार्य-कर्ताओं को अभिनयादि कर्तृत्व के लिये वे हमेशा प्रोत्साहित करते आये हैं। इसी सम्बन्ध में उनकी नाट्य तथा अन्य कलाओं के सम्बन्ध में उत्कट रसिकता भी सहज स्मरणीय है।

उनकी दीर्घ समाज-सेवा तथा प्रभूत राष्ट्रीय कार्य के सम्बन्ध में विस्तार से कहने का अधिकार मुझे नहीं है। फिर भी उनका मिलनसार स्वभाव तथा संक्षेप में पर मिठास

के साथ मार्गदर्शन करने का तरीका कभी भी भूला नहीं जा सकता। काम के दौरान में समय समय पर छोटे मोटे मतभेद होने पर ऐसे प्रसंगों में से किस तरह मार्ग निकाला जाय यह जिस ढंग से उन्होंने बताया उसका आगे चल के दीर्घ काल तक लाभ होता रहेगा। विशेषकर संसदीय कारवायी में संपूर्णतया मराठी का प्रयोग करने के लिये जब शब्दावलि बनाने का अवसर आया और अंग्रेजी शब्दों के सूक्ष्म अर्थभेद व्यक्त करने के लिए उत्पन्न पर्यायों का प्रयोग अपरिहार्य हो गया। उस समय शुरू शुरू में ये नये प्रतिशब्द कैसे क्लिष्ट एवं जटिल प्रतीत होंगे। अतः प्रचार में रूढ किन्तु अभ्यास तथा अविन्यास इतर शब्द कुछ समय तक चालू रखना कैसे इष्ट है इसका उन्होंने किया हुवा विवेचन संस्मरणीय रहेगा। सदन में अनुशासन रखने के सम्बन्ध में कुछ खास कहने की आवश्यकता नहीं है। कारण उनकी उपस्थिति में सभागृह में जो शांति नित्य रहा करती थी वही इसका उत्तम साक्ष है। दिनांक १२ मार्च १९६२ के मराठा में अपने सम्पादकीय अग्रलेख में विधानसभा के नामांकित सदस्य तथा संसदीय शब्दावली विषयक एक समिति के भूतपूर्व अध्यक्ष तथा दूसरे समिति के प्रमुख विचारक आचार्य प्र. के. अत्रे ठीक ही लिख चुके हैं कि घंटी पर अंगुली-स्पर्श कर के 'ऑर्डर' 'ऑर्डर' का उच्चारण करते ही सारे सदस्य गण अविलंब मुखस्तंभ हो जाया करते थे। जदी सभागृह के अंदर सभागृह की प्रतिष्ठा रखने के लिए सदस्यों के व्यवहार पर उनकी कड़ी निगरानी रहा करती थी, वैसे ही सदस्यों की व्यक्तिगत सुखसुविधा की व्यवस्था में भी वे हमेशाही अग्रेसर रहा करते थे। उनका यह स्पष्ट आदेश था कि सब सदस्यों के वेतन तथा भत्ते अविलम्बेन दिये जाये और उनकी इस सम्बध मे किसी प्रकार की असुविधा न होने दी जाय।

शैक्षणिक तथा कलात्मक संस्थाओं के बारे में उनके प्रदीर्घ परिश्रम का प्रत्यक्ष निदर्शन विगत एकार्ध वर्ष के अल्प सहवास में भी कई बार देखा है। अनेकानेक प्रदर्शनों के उद्घाटन् पर तथा आदाय समारोहों पर (चॅरिटि शो)] उनका कार्यालाप वारंवार वृत्तपत्रों मे विस्तार से वर्णित किया गया है। अब अध्यक्ष पद के गुरुभार के ६ वर्ष तक अत्यंत प्रतिकूल परिस्थिति मे अत्याधिक संतोषप्रद रूप से निभाये गये। इस तपस्यार्ध के बाद वे अधिक ही उत्साह से अपने सारे सार्वजनिक कार्योंको बढावा दे रहे है ऐसा प्रतीत होता है।

अभिनदन ग्रंथ समिति को यद्यपि उनके भाषा प्रभुत्व के बारेमें कुछ अपेक्षित नहीं है; तथापि मेरा यह कर्तव्य है कि इसके सम्बन्ध में भी मै अपना सादर आश्चर्य प्रकट करूँ। उनकी मातृभाषा तेलगू होने पर भी मराठी उनके रोम रोम में समाई हुई है तथा हिन्दी, गुजराती और अंग्रेजी समान रूपसे उनके जिव्हाग्र पर संसिद्ध है। उनका हिन्दी भाषा पर असामान्य अधिकार कही बार प्रकट हो चुका है। अभी अभी महिला समाज शिक्षण समिति के मेट्रो-चित्रपट भवन में आयोजित समारोह में परमश्रेष्ठ राज्यपाल के सम्बन्ध में तथा अन्य विषयोंपर निबद्ध हिन्दी भाषण उसका पर्याप्त प्रमाण है। जिन सदस्योंको अँग्रेजी समझने में कठिनाई होती है उनके लिए अन्य भाषाओं में प्रबन्ध होना चाहिए,

इसका उन्होंने विशेष ध्यान रखा है। तथा वे स्वयं भी यथाशक्य एवं यत्र शक्य समाजगम्य भाषा में ही प्रभावी रूप से भाषण दिया करते थे।

सफल भाषण के लिये आवश्यक अन्यतम साधन भी उनके पास था। उनकी बुलन्द आवाज-जैसा कि आचार्य अत्रे लिख चुके है। उनकी धीरगंभीर ध्वनितुलना मेघनाद अथवा सिंहनाद से की जा सकती है। एक बार अविरोध्य आदेश "कृपया बैठिये" होने पर उसका निषेध करने की किसी की हिम्मत नहीं होती थी। यह भी सब अनुभव कर चुके हैं। समागृह में जरा भी अशान्ति फैलने पर वे जैसे पोते का कान दादा ऐंठता है उसी प्रेम से 'समागृह में गडबड न हो' का इशारा दिया करते थे और तुरन्त निःस्तब्धता छा जाती थी। उनके गम्भीर, सुप्रतिष्ठ तथा निःपक्ष कार्यसंचालन के सम्बन्ध में अधिकारी लोग कह चुके हैं अतः पुनरावृत्ति में नहीं करूंगा किन्तु समागृह के सदस्यों से व्यक्तिगत परिचय बढाने की उनकी लालसा अदम्य कही जायेगी। समय समय पर सदस्यों के छोटे मोटे गटों को चायपान पर बुला कर वे जिस तरह घनिष्ठता बढाते थे वह वास्तव में अनुकरणीय है। यह तो सर्वविदित ही है कि चाय का उन्हें कुछ चस्का सा ही था एवं चाय की चुस्की में उन्हें दिन के किसी भी समय पर रस आया करता था।

कई महत्वपूर्ण बातों का वे अत्यंत आसानी से निर्णय कर लिया करते थे। समागृह २६४ सदस्यों को वे किसी क्षण यथार्थ नाम से सम्बोधित कर सकते थे। बडे बडे नेता भी इस तीव्र स्मरणशक्ति पर आश्चर्यचकित हो चुके हैं। जैसा कि आचार्यजी ने कहा है-सभ्यता, सौजन्य तथा संयम का समन्वय इस सभापति में मूर्तिमान हुआ था।

विधान सभा में अपने अन्तिम भाषण में उन्होंने कहा कि सदन का सारा ही कार्य मराठी में सम्पन्न हो। इस हेतु किया गया प्रयत्न इनके अध्यक्षीय कार्यवाही का उच्चतम अंश है। मैं निःसंकोच यह कह सकता हूँ कि उनके समग्र कार्यकाल में यह अन्यतम श्रेय है। कुछ अन्य सदनों की तरह इस कार्य में जल्दबाजी न करते हुए तथा किसी प्रकार का दबाव न डालते हुए उन्होंने एतद्विषयक समिति को अपना कार्य सुचारु रूप से सम्पन्न करने में जो प्रेरणा दी वह सर्वत्र ही मार्गदर्शिका हो सकती है। इस महान् कार्य में अपने अल्प आवास में मैं भी कुछ सहयोग दे सका यह मेरा बहुत बडा सद्भाग्य है। संसदीय या संहिता जैसी क्लिष्ट तथा पानःपुन्या से पूर्ण कार्य-पद्धति पूर्णतया मराठी में कार्यान्वित हो सके इसके लिए उन्होंने विशेष व्यवस्था की। एवं हो सके तो प्रत्येक अंग्रेजी शब्द का अन्तिम मराठी पर्याय प्राप्त होने के पूर्व भी मराठी में ही सब कामकाज हुआ करे ऐसी खटपट वे कर रहे थे। कुछ विलम्ब से क्यों न हो किन्तु यह परिश्रम फलद्रूप हो ही गया है यह बात मेरी तरह उन्हें भी अत्यन्त संतोषप्रद होगी ऐसा मेरा विश्वास है।

---



श्री. सयाजीराव व सौ. लक्ष्मीबाई सिलम

तेलगू मद्यपान निषेधक मंडळ.

# मद्यपान निषेधक वचन.

ता 25 माहे Nov सन १९१७

मी, खाली सही करणार शपथपूर्वक लिहून देतो की, कोणत्याही मादक पेयाचा स्वीकार करणार नाहीं, आणि इतरांनीही माझ्याप्रमाणेंच वागण्याचा शक्यतो उपदेश करीन.

नांव Sayajirao Silam

पत्ता 2nd Kamathi Pura, Bombay

सूचना:--शपथ घेण्याच्यापूर्वी सही करणाऱ्याने मनाचा दृढनिश्चय मनांत वागवावा. संस्थेच्या उद्देशाचे उल्लंघन झाल्यास त्या सभासदास [illegible] संस्थेतून काढून टाकण्याचा अधिकार त्या पत्र मंडळाला आहे. स.

श्री. सयाजीराव सिलम यांनी मद्यपानबंदी हें आपलें जीवनध्येय पन्नास वर्षांपूर्वी ठरविले त्याची साक्ष देणारें प्रतिज्ञापत्रक त्यांच्या हस्ताक्षरात




महाराष्ट्राचे राज्यपाल श्रीप्रकाशजी याच्या उपस्थितीत भाषण करीत असताना



दारूबंदी सप्ताहाच्या एका प्रसंगी
राष्ट्राध्यक्ष डॉ. राजेन्द्रप्रसाद यांच्यासह



साक्षरता प्रसाराच्या ज्ञानज्योतीच्या मिरवणुकीत



भारत सेवक समाजाचे महाराष्ट्रातील प्रमुख संघटक



जे. जे. स्कूल ऑफ अप्लाईड आर्टच्या रौप्यमहोत्सवाच्या वेळी व्यावसायिक कलेच्या
विद्यार्थ्यांनी श्रमदानाने केलेल्या प्रतीकाच्या उद्घाटन प्रसंगी



द्विभाषिक मुंबई राज्य विधानसभेचे सभापति



सर्वश्री मोरारजीभाई देसाई, यशवंतराव चव्हाण, सयाजीराव सिलम, गोपाळराव खेडकर व वसंतराव नाईक.



पाँदिचेरीला राष्ट्राध्यक्ष डॉ. राधाकृष्णन् यांना भेट दिली त्याप्रसंगी

## ARTISTS' FRIEND—SHRI SAYAJIRAO SILAM

by Prof. V. N. Adarkar, Director of Art, Maharashtra State

Shri Sayajirao Silam's role in the political and Social fields has a place of pride in the heart of the public at large. Before taking over the responsibility as the Lt-Governor of Pondicherry, till recently, he was the Speaker of Maharashtra's first legislative assembly. However, not much is probably known of one important facet of his multifarious activities and this relates to his invaluable contribution to the realm of art. This may be so, because art as such has not yet become so much a subject of keen popular interest as it is in the more advanced countries. In such conditions, a political-cum-social leader can play a really beneficent role in giving impetus to the progress of art because both by training and practice his approach is directed to multituders. The field of art in Maharashtra State is immensely indebted to Shri Silam who has been a foremost patron and promoter of Art.

In this respect Shri Silam has followed the footsteps of the illustrious promoters and patrons of art and artists. Development of art and art education has not been overlooked by politicians and social workers Even before the establishment of the Bombay University a century ago, the first school of art in the country was started in Bombay. The Sir J. J. School of Art, Bombay was the successful culmination of the dream of Sir Jamshedji Jejeebhoy, the first baronet. The munificence of Sir J. J. was continued by Sir Cawasji Jehangir. The ardent desire of Sir J. J. in propagation and promotion of art and art education kindled the zest in such personalities like late Dr. M. R. Jayakar, Sir Phiroz Sethna, Shri Balasaheb Kher, Shri Kanhaiyalal Vakil and Shrimati Hansa Mehta.

Following the traditions of these lovers of art Shri Silam has been helping the cause of art. In close association with the noted artist, late Shri N. E. Puram, of Poona, Shri Silam helped establish the well known Puram Art Institute at Poona, which has since grown into a full fledged school of art in that part of the country.

The irresistible call of country's freedom, however, interrupted his active participation in activities connected with art, but when Shri Silam became the speaker of the Maharashtra Legislative Assembly his innate love for art reasserted itself, and found effective expression on most opportune occasions. One such instance was in 1958 when he acted as the Chairman of the Sir Jamsetji Jejeebhoy Centenary Celebrations Committee formed under the auspices of the Indian Sculptors' Association. Seizing the opportunity to voice the feelings of the artists, Shri Silam underlined the imminent necessity for the establishment of an Art Gallery in the North of Bombay to meet the demands of the extensive city. It was on this occasion, Shri Silam rightly voiced the demand of the artists' community in Maharashtra for the creation of Art Directorate, for unifying the control of art activities in our State. The first such Art Directorate in our country was established by Government of Maharashtra in 1965. It was also due to his suggestion the nomenclature of the Sir J. J. Institute of Commercial Art was changed to that of Sir J. J. Institute of Applied Art.

Shri Silam has taken interest in the Art Education and has associated himself in the Silver Jubilee Celebrations of Sir J. J. Institute of Applied Art, in the year 1960. The Institute is the only one of its kind, imparting education in Applied Art in our country. Under the able guidance of Shri Silam, the Silver Jubilee Celebrations Committee sought scholarships from Government, and raised and advanced funds to Government of Maharashtra for establishment of the first Centre for Training in Industrial Design, in our country at the Sir J. J. Institute of Applied Art. A monument to commemorate the Silver Jubilee, which was erected by the students through "Shramdan" was unveiled at the hands of Shri Silam on this occasion.

The scheme of forming the Kala Nagar Cooperative Housing Society Ltd., at Bandra took shape under his guidance. The first phase of fifteen residential houses for artists is already complete and the future expansion of this scheme which includes a multipurpose hall, art students' hostel, Art Gallery and many other things which are going to make this place bussing with art activities is on its way of realisation soon. In commemoration of this first step a monument, "Yeshwant

Nandadeep" dedicated to the popular Ex-chief Minister, Shri Yeshwantraoji Chavan of our State was erected by the Artists in Kala-Nagar in the North of Bombay. Being a very practical man, he in cooperation with his associate workers set about trying to bring his ideal of an art gallery to fruition, and to his great satisfaction a suitable place in the North of Bombay has already been earmarked for this purpose. Shri Silam's idea of an art gallery almost received an official approval when Shri Yeshwantraoji Chavan, the popular Ex-chief Minister of Maharashtra himself stressed the importance of an art gallery in North of Bombay and Shri Chavan's declaration of a revenue-free land for this Art Gallery, was a sure indication that Shri Silam's idea is shortly going to be a reality.

The proposed gallery is planned to provide wings for a permanent collection of rare art treasures of our country, one man-shows, offices of the various art societies in the city, studios for artists, accommodation for a library and rooms for guest artists. Situated close to the houses of artists, the art gallery would virtually serve as 'Sanctum Sanctorum' to them. Shri Silam, unassuming but very industrious, has always been readily accessible to one and all particularly the artists who rush to him in moments of difficulties and seek his sagacious advice and guidance, which Shri Silam has always given them only too willingly.

No doubt, men cannot live without bread but surely they cannot live with bread alone. There is an innate urge in all men, irrespective of their status, to acquire and enjoy art which is one of the finer and ennobling pursuits of life. Leaders like Shri Silam who have given their invaluable time and effort to bring art within the reach of a wider public, to better their lives and to relieve them from the humdrum drudgery of life, are rare.

On his *seventieth birthday the artist* community as well as the general public will, I am sure, whole heartedly wish "May God bless Shri Silamji with a very happy and long life".

# SHRI SAYAJEERAO SILAM

by Shri T. A. Kulkarni

Shri Sayajirao Silam, who worked as the speaker of the Bombay State Assembly and the Maharashtra State Assembly for the last five years, acquitted himself very creditably and secured the encomiums of all political parties. My contact with him goes back to the year 1912 when he was my pupil in the matriculation class. I taught him English and History and I can very well remember the hard work which he did during those days. In those days many of the teachers were very particular about close personal contact with pupils. Those pupils who were honest and painstaking were benefited by the efforts of their teacher. I have a very vivid recollection of the response which I received from Shri Silam and as a result he developed excellent habits of study which he kept up in his college work and later life.

Later on in life when he had to struggle to establish his business he had to work hard. In spite of the heavy work which he had to do in his early life he cultivated the habit of finding time for his valuable work of social service. It is this spirit of social service work of helping the down trodden brethren in whose midst he lived which ultimately became the key of his success in life. The first hand study of human nature is the best education for a person who intends to take up work in public life. In this study one comes across various shades of human character and to win over the good opinion of all these persons is a *training in self-control which becomes an asset of* great value for a successful public worker.

In all the public work which Shri Sayajirao did, he gathered knowledge and experience which stood him in good stead in his successful career of five years as a speaker of the State Assembly. *His work in Congress Committees, in the Bombay* Corporation, in the Bombay University Senate and finally in the State Assembly as a whip, in all these spheres and in several other activities he learned valuable lessons and cultivated the spirit of compromise which has made him a successful speaker The patience and the skill of meeting ones opponents'

views are the two great virtues which have made him what he is. During the stormy years of the life of the Assembly, Sayajirao won the applause of all parties of public opinion only because people became convinced of his sincerity and straightforwardness. I am extremely proud of this achievement of my illustrious pupil and I give him my best blessings for still greater and more glorious achievements in times to come.

# A GREAT HUMANIST

[Smt. Sulochana Modi, President, Bombay City Social Education Committee

At least I was greatly surprised when I found that an awe-inspiring tall and unique looking person having peculiar type of mustaches and a great political leader like Mr. Silam can endear himself to hundreds of people who had the opportunity to work at close quarters with him. He has proved that appearances are deceptive. He is not what he looks, but he is a kind hearted gentleman with a genial temperament. It is perhaps the experience of all those who had the good fortune to work with Mr. Silam on some Committee or for some good cause.

Though belonging to the same political party I had not any close contact with him nor had I any opportunity to work with him, till he was appointed President of the Bombay City Social Education Committee by the Government of Maharashtra. I have the good fortune to serve the said Committee for nearly seventeen years and during that period he was at the helm of the Committee for a period of three years Before that I knew him as a Congress Worker of repute holding high and responsible positions one after the other. He has a brilliant record of service to his countrymen in social, political, civic and educational field for more than thirty, forty years. For a number of years he was a member of the Bombay Municipal Corporation and his contribution to the development plans of the city are not unknown to the citizens of Bombay. As a legislator his services to the Bombay Legislative Assembly and especially his tenure of long seven years as speaker will remain a legend.

In spite of being a politician one could find that Mr. Silam had an innate interest in welfare activities especially for those that were backward and women and children. In his electoral constituency viz. Khetwadi area, as well as outside it and even outside the city he was and is still connected with a number of cultural and educational institutes either as a president or a secretary or a member. Scores of institutes and a large number of people have responded to the call of

